श्री गोपालकृष्णाय नमः। वि. ऊ. वोडस

# सुलभ श्रीमद्भागवत

## भाग १ ला

सुलभ श्रीमद्भागवत भाग १ ते ६ या ग्रंथास
**महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ यांचेकडून**
अनुदान मिळाले आहे.
सदर ग्रंथाची किंमत त्यांनीच ठेविलेली आहे.

### स्कंध १, २ व ३

सन १९६४

**किंमत ७ रुपये**

किंमत १० रुपये.

# प्रस्तावना

आपल्या आर्यऋषिप्रणीत सर्वमान्य अशा श्रीमद्भागवत ग्रंथाचा लाभ संस्कृताचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांपासून वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध अशा सर्व स्थितींतील लोकांस सुलभतेनें घेतां यावा, अशा उद्देशानें आम्ही अन्वय, पदच्छेद, सरलार्थ, टीपा, उपसंहार, श्लोकसूची अशा पद्धतीनें या ग्रंथाच्या प्रकाशनाचें काम हातीं घेतलें आहे. अशा प्रकारें श्रीमद्भागवतप्रकाशनाचा हा प्रयत्न पहिलाच असून तो बराच विस्तृत आणि खर्चाचा आहे; तथापि हिंदुधर्माभिमानी श्रीमद्भागवतभक्त वाचकांच्या साहाय्यानें आम्हीं तो शेवटास नेण्याचें ठरवून आतांपर्यंत तीन स्कंध पूर्ण केले आहेत आणि याच पद्धतीनें पुढें निर्विघ्नपणें काम चालल्यास दोन-अडीच वर्षांच्या अवधींत हा संपूर्ण ग्रंथ वाचकांच्या सेवेंस सादर करूं अशी उमेद आम्हांस वाटत आहे आणि परमेश्वरकृपेनें ती सफल होईल अशी आशा आहे.

आम्हीं आरंभिलेलें हें काम बरेंच विस्तृत, तसेंच विशेष खर्चाचें असल्यामुळें साधारण स्थितींतील मराठी वाचकांस त्याचा लाभ घेणें जरा दुरापास्त झालें आहे. श्रीमद्भागवतासारख्या सर्वमान्य पुराणग्रंथाचा लाभ आपणांस व्हावा, अशी इच्छा सर्व भाविक हिंदुधर्माभिमानी मनुष्यांस होणें स्वाभाविक आहे; परंतु हल्लींच्या विनकलहाच्या काळांत आर्थिकदृष्ट्या ते अशा ग्रंथास पारखे झाले आहेत. ही अडचण लक्षांत घेऊन व कित्येक मित्रमंडळीच्या सूचनेवरून, सर्वसाधारण मराठी वाचकांस या ग्रंथाचा लाभ सुलभतेनें घेतां यावा अशा उद्देशानें, ' सुलभ–श्रीमद्भागवत ' या नांवानें हा प्रयत्न आम्हीं केलेला आहे. श्रीमद्भागवताचें नुसतें मराठी भाषांतर म्हणून चिपळूणकर मंडळीनें प्रसिद्ध केलें; परंतु तें आज दुर्मिळ झालें आहे. शिवाय त्याचें भाषांतर मूळ श्लोकांच्या अनुरोधानें क्रमशः केलेलें नसल्यामुळें प्रत्येक श्लोकाचा भावार्थ त्यावरून निश्चित करतां येत नाहीं. ही अडचण लक्षांत घेऊन आम्ही या ग्रंथांत प्रत्येक श्लोकाचा भावार्थ मराठी वाचकांस सुलभतेनें समजावा असा प्रयत्न केलेला आहे. आमचें हें मराठी भाषांतर मूळ श्लोकांस धरून असल्यामुळें तें कादंबरी किंवा गोष्टीसारखें जरी वाटणार नाहीं, तरी मुळांतील रहस्य मराठी वाचकांस समजून देण्यास तें अधिक श्रेयस्कर होईल असा आम्हांस भरंवसा आहे. ज्या भगवद्भक्तांस सान्वय–सार्थ असा ग्रंथ घेण्याचें सामर्थ्य नाहीं;परंतु श्रीमद्भागवताचा लाभ सुलभतेनें मिळावा अशी इच्छा आहे, अशा सर्वसाधारण वाचकांकरितां हा आमचा दुसरा प्रयत्न आहे. आमचे प्रिय वाचक तो गोड करून घेतील असा आम्हांस भरंवसा आहे.

**श्रीकृष्णार्पणमस्तु**

---

सुलभ श्रीमद्भागवत भाग १ ते ६ या ग्रंथास महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती

॥ श्री ॥

# सुलभ श्रीमद्भागवत–भाग १ ला

## अनुक्रमणिका

### प्रथमस्कंध

---

---

## द्वितीय स्कंध

# तृतीय स्कंध

## या भागांत आलेलीं चित्रें

॥ श्रीः ॥

# सुलभ श्रीमद्भागवत



## प्रथम स्कंध

### अध्याय १ ला

श्रीमद्वेदव्यासांनीं अनेक प्रकारचे ग्रंथ लिहिले, नाना प्रकारच्या पुराणांची रचना केली; परंतु त्यांच्या मनाचें समाधान म्हणून कांहीं होईना. अशा स्थितींत अकस्मात् नारदमुनींची गांठ पडली. तेव्हां व्यासांनीं आपल्या मनाची स्थिति त्यांस कळविली आणि मनाचें खरेंखरें समाधान व्हावयाला कोणता उपाय करावा, असा त्यांस प्रश्न केला. तेव्हां नारदमुनींनीं सांगितलें कीं, ज्यामध्यें भगवंताच्याच लीला ओतप्रोत भरलेल्या आहेत असा एखादा ग्रंथ तयार करावा, म्हणजे आपल्या मनाचें समाधान होईल. ह्या नारदमुनींच्या उपदेशाप्रमाणें व्यासमुनींनीं 'श्रीमद्भागवत' ह्या नांवाचा ग्रंथ तयार केला. त्यांतील मंगलाचरणाचा पहिला श्लोक असा आहे :—

ज्याच्या ठिकाणीं चाललेलीं तीन कार्यें-उत्पत्ति, स्थिति व लय किंवा सत्त्व, रज व तम ह्या त्रिगुणांनीं पंचमहाभूतांचीं होत असलेलीं कार्यें आपल्या नेत्रांना स्पष्ट दिसतात. तीं खोटीं म्हणतां येत नाहींत. प्रकाश, उदक आणि मृत्तिका हीं परस्परांशीं संयुक्त होऊन त्यांचीं विलक्षण रूपांतरें होतात आणि त्यांच्याविषयीं भ्रमही उत्पन्न होतो. उदाहरणार्थ, मृगजळ. हें जरी दिसण्यांत जळाप्रमाणें भासतें तरी तें खरोखर जळ नव्हे, तें सूर्यकिरणांचेंच स्वरूप आहे ही गोष्ट आपल्याला कळते, पण ती कशाच्या सामर्थ्यानें कळते? तर तीही परमेश्वराच्या प्रभावानें किंवा आत्मज्ञानानेंच कळते. हा सारा भ्रम नेहमीं दूर होऊन सत्यस्वरूपाचें ज्ञान होतें आणि ब्रह्मांडाच्या उत्पत्ति, स्थिति, लय इत्यादि कार्यांमध्यें आणि इतरत्रही त्याचीच सत्ता असल्याचें दिसून येतें. ह्यावरून तो परमेश्वर ज्ञानसंपन्न आहे; स्वयंप्रकाश आहे; इतकेंच नव्हे तर ज्यांच्या योगानें मोठमोठ्या विद्वानांसही मोह पडतो ते वेद, सर्वांत आद्य वेदोनारायण—विद्वद्वर्य—जो ब्रह्मदेव त्यालाही त्यानेंच आपल्या मनानें पढविले; अर्थात् अंतःकरणांत त्याच परमेश्वराची स्फूर्ति झाल्यामुळें त्याला ते अवगत झाले. असा जो सत्यस्वरूपी परमेश्वर त्याचें आम्ही आमच्या शिष्यांसह ग्रंथारंभीं विघ्ननिवारणार्थ चिंतन करतों ॥ १ ॥

आतां ह्या ग्रंथांत काय सांगितलें आहे? अशी आपल्याला जिज्ञासा उत्पन्न होईल, ह्याकरितां पुढील श्लोकांत सांगतात :—

ह्या महामुनींनीं केलेल्या श्रीमद्भागवत ग्रंथामध्यें निर्मत्सर अशा सत्पुरुषांचा अत्युत्कृष्ट धर्म सांगितलेला आहे. त्यांत यत्किंचित्‌ही कपट नाहीं. तो शुद्ध निष्काम आहे. आणखी त्यावरून कल्याणकारक व तापत्रयाचें निर्मूलन करणारी सत्यवस्तु कोणती, ह्याचेंही ज्ञान होतें. इतर कोणतींही साधनें घेतलीं तरी त्यांनीं परमेश्वर हा तत्काल अंतःकरणामध्यें कधीं तरी आकलन केला जाईल काय? कधींच जाणार नाहीं. त्याला कांहीं ना कांहीं तरी कालावधि हा पाहिजेच; पण ह्याचें तसें नाहीं. ह्या भागवतधर्माच्या सेवनानें, श्रवणानें, कित्येक पुण्यवान् पुरुषांनीं आपल्या अंतःकरणांत परमेश्वर हा तत्काल आपलासा केला आहे ॥ २ ॥

आतां भागवतधर्म सर्वांत श्रेष्ठ आहे म्हणूनच त्याचा आदर करावा असें नाहीं, तर भागवतधर्म हें सर्व वेदांचें व श्रुतिस्मृतींचेंही सार आहे म्हणून त्याचा परमादरानें स्वीकार करावा, हें सुचविण्यासाठीं सांगतातः—

भागवत हें अमृतरसानें ओतप्रोत भरलेलें वेदरूप कल्पतरूचें फळ शुकाचार्यांच्या मुखांतून ह्या मृत्युलोकावर गळून पडलेलें आहे. जें फल परिपक्व असेल, रसाळ असेल, तेंच फल शुक (पोपट) ग्रहण करतो; कच्च्या फळाला शुक आपली चोंचही लावीत नाहीं, ही गोष्ट सुप्रसिद्धच आहे. हें भागवतरूपी फळ शुकाचार्यांच्या मुखांतूनच पडल्यामुळें ह्यांत अमृतासारखा मधुर रसच भरलेला आहे. ह्यांत टरफल, बीं, पडदे वगैरे दुसरे टाकाऊ पदार्थ नाहींत. ह्याकरितां अहो रसिक आणि भाविक जन हो! त्याचा रस तुम्ही ह्या पृथ्वीतलावर नेहमीं पुनः पुनः प्राशन करीतच राहा ॥ ३ ॥

विष्णूच्या विजयानें पुनीत झालेला प्रदेश जो 'अनिमिष'[1] त्यांतील नैमिशारण्यामध्यें[2] विष्णुलोकप्राप्त्यर्थ शौनकादिक ऋषींनीं एक हजार वर्षें चालविण्याच्या संकल्पानें यज्ञास आरंभ करून त्याच्या सांगतेच्या उद्देशानेंच ते सर्व ऋषि तेथें राहिले होते ॥ ४ ॥

ते सर्व ऋषि एके दिवशीं प्रातःकाळचें होम-हवनादि कृत्य समाप्त झाल्यानंतर सूताचा सत्कार करून बसले असतां त्यांनीं मोठ्या आदरानें सूतास प्रश्न केला ॥ ५ ॥

ऋषि म्हणतात :—हे पुण्यपुरुषा! आपण भारतादि इतिहासांसह अनेक शास्त्रें व पुराणें ह्यांचें अध्ययन केलें आहे, इतकेंच नव्हे तर तीं दुसऱ्यांसही पढविलीं आहेत. ॥ ६ ॥

---

१. पद्मपुराणांत गौरमुख नामक मुनि व भगवान् ह्यांचा संवाद आहे. त्यांत भगवान् म्हणतात, "ह्या प्रदेशांत मी सर्व दैत्यांचा एक निमिष न लागतां संहार केला; म्हणून ह्या क्षेत्राला 'अनिमिष' असें नांव पडलें."

२. 'नेमि' म्हणजे चाकाची धाव आणि 'श' म्हणजे उकलली. यावरून चाकाची धाव ज्या ठिकाणीं उकलली तें स्थान असा अर्थ होतो. ह्याविषयीं अशी कथा आहे कीं, कित्येक ऋषींना तपश्चर्येसाठीं यथायोग्य जागा पाहिजे होती, ती कोठें दृष्टीस

तसेंच विद्वच्छ्रेष्ठ भगवान् व्यास जितकीं जितकीं शास्त्रें व पुराणें जाणतात व परमेश्वराचीं सगुण व निर्गुण स्वरूपें यथावत् जाणणारे अन्य ऋषि जीं जीं शास्त्रें जाणतात ॥ ७ ॥

हे शांतस्वरूप साधो ! त्या व्यासांच्या व ऋषिवर्यांच्या कृपेनें आपल्यालाही त्या सर्वांतील रहस्य परिपूर्णपणें माहीत आहे. कारण, गुरु हे कितीहि गूढ रहस्य असलें तरी तें आपल्या प्रेमळ शिष्याला सांगितल्यावांचून राहात नाहींत ॥ ८ ॥

हे आयुष्मन् ! त्या त्या ग्रंथामध्यें पुरुषाला कल्याणकारक असें जें काय आपण ठरविलें असेल तें आपण आम्हांस सांगावें ॥ ९ ॥

हे साधो ! खरोखर ह्या कलियुगामध्यें लोक बहुतकरून अल्पायुषी झाले आहेत. ते आळशी, मंदबुद्धीचे आणि अत्यंत हतभागी—दरिद्री आणि नाना प्रकारच्या रोगांनीं ग्रस्त झालेले आहेत ॥ १० ॥

हे साधो ! आपण तर निरनिराळे अनेक ग्रंथ अवलोकन केले असतील व त्यांत मनुष्यांच्या कल्याणाचे अनेक उपाय सांगितलेले असतील. ह्याकरितां आपण जें जें काय अवलोकन केलें असेल, त्यांतील आपल्या मनाप्रमाणें सार निवडून काढून श्रद्धाळू अशा आम्हांस सांगावें; ज्यायोगें आमचा आत्मा सुप्रसन्न होईल ॥ ११ ॥

हे सूता ! तुझें कल्याण असो. भक्तांचा पालनकर्ता जो भगवान् त्यानें जें करण्याच्या इच्छेनें पिता वसुदेव आणि माता देवकी ह्यांच्या उदरीं अवतार घेतला, तें तुला माहीत आहेच ॥ १२ ॥

अहो सूत ! ती गोष्ट ऐकण्याविषयीं आम्ही अगदीं उत्सुक झालों आहों; ह्यास्तव आपण ती अवश्य आम्हांस सांगावी. सामान्यतः त्या परमेश्वराचा अवतार प्राणिमात्रांच्या पालनासाठीं आणि त्यांच्या समृद्धीसाठींच असतो ॥ १३ ॥

जो कोणी भयंकर अशा संसारांत गुंतून दीन होतो; त्यानें त्याचें नाम उच्चारलें कीं पुरे, तो त्या संसारदुःखापासून मुक्त होतो. फार काय सांगावें ? स्वतः भय हेंच त्याला थरथर कांपत असतें ! ॥ १४ ॥

हे सूता ! ज्याच्या चरणांचा आश्रय करणारे असे जे शांत मुनि, त्यांचा जर प्राणिमात्रास स्पर्श झाला, तर तेसुद्धां तत्क्षणीं पुनीत होतात. गंगेच्या उदकानेंही पवित्रपणा

---

पडेना म्हणून ते ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्यांनीं त्यांस प्रश्न केला कीं, आम्हांस तपश्चर्येस उत्तम जागा कोणती, तें सांगावें. तेव्हां ब्रह्मदेवांनीं मनानेंच एक चक्र निर्माण करून तें त्या ऋषींच्या स्वाधीन केलें आणि सांगितलें कीं, हें चक्र भूमीवर सोडा आणि तें जेथें थांबेल, ती जागा तपश्चर्येस योग्य आहे, असें समजा. त्याप्रमाणें त्या ऋषींनीं तें चक्र भूमीवर सोडलें व तें जेथें थांबलें त्या प्रदेशाला ‘ नैमिशारण्य ’ असें नांव पडलें. ह्याला ‘ नैमिषारण्य ’ असेंही म्हणतात.

येतो; पण त्याला बराच काल सेवा करावी लागते. ह्यावरून भगवद्भक्त हे गंगेपेक्षांही श्रेष्ठ होत हा भावार्थ ॥ १५ ॥

पातकांपासून आपण मुक्त व्हावें, अशी ज्याला इच्छा आहे, असा कोणता पुरुष, सत्कीर्तिमान् पुरुषांनीं ज्याच्या पराक्रमाची प्रशंसा केली आहे, अशा भगवंताचे, पातकांचें क्षालन करण्यास समर्थ असे गुणानुवाद ऐकणार नाहीं ? ॥ १६ ॥

ज्याचीं उदार व उत्तमोत्तम चरित्रें व गुणानुवाद साधुसंतांनीं गाइले आहेत, आणि जो लीलामात्रेंकरून मत्स्यकच्छादि स्वरूपें धारण करतो, त्याचीं चरित्रें श्रद्धाळू अशा आम्हांला सांगा ॥ १७ ॥

हे बुद्धिमंता ! आतां आपल्याच मायेच्या कौतुकानें मनसोक्त क्रीडा करणाऱ्या ईश्वरस्वरूपी श्रीकृष्णाच्या मंगलदायक अवतारकथा सांगाव्या ॥ १८ ॥

साऱ्या त्रिभुवनांत ज्याची कीर्ती दुमदुमत आहे, अशा परमेश्वराचे पराक्रम ऐकतां ऐकतां आमची तृप्ति म्हणून होतच नाहीं. रसिक लोकांना तर ते क्षणोक्षणीं अधिकाधिक गोडच वाटतात ॥ १९ ॥

त्या भगवंताचें चरित्र मोठें गूढ आहे. त्यानें आपल्या मायेच्या योगानें मनुष्याचें स्वरूप धारण करून बळरामासहवर्तमान अनेक प्रकारचीं अलौकिक कृत्यें केलीं. त्याचे पराक्रम अत्यंत अद्भुत होत ॥ २० ॥

कलियुग प्राप्त झालें असें जाणून ह्या विष्णुक्षेत्र नैमिषारण्यामध्यें पुष्कळ वर्षें सत्र करण्याच्या उद्देशानें आम्ही बसलों आहों. त्यामुळें कृष्णाचीं चरित्रें ऐकण्यास आम्हांस पाहिजे तितका वेळ आहे ॥ २१ ॥

पुरुषांचें सर्व सामर्थ्य हरण करणाऱ्या व तरून जाण्यास कठीण अशा कलीला तरून जाण्याची इच्छा करणाऱ्या आम्हांला, परमेश्वरानें, समुद्र ओलांडून जाण्याची इच्छा करणाऱ्यापुढें आलेल्या नावाड्याप्रमाणें, आपणांस दाखवून दिलें आहे ॥ २२ ॥

हे सूता ! योगिश्रेष्ठ, धर्मसंरक्षणकर्ता व ब्राह्मणांचा कैवारी असा श्रीकृष्ण-परमात्मा सांप्रत निजधामास गेला असतां, धर्म कोणाला शरण गेला तें सांगा ॥ २३ ॥

॥ पहिला अध्याय समाप्त ॥

---

# अध्याय २ रा

पूर्वी सांगितल्याप्रमाणें ऋषींनीं केलेले प्रश्न ऐकून रोमहर्षणाचा पुत्र जो उग्रश्रवानामक सूत, त्याला अत्यंत आनंद झाला. आणि त्यानें त्या ऋषींच्या प्रश्नांचें अभिनंदन करून उत्तर देण्यास प्रारंभ केला ॥ १ ॥

शुकाचार्य जन्मापासूनच योगसंपन्न असून अत्यंत मनोनिग्रही होते. त्यांचा व्रतबंधही झालेला नव्हता. त्यांनीं सारा कर्ममार्गच सोडून देऊन सर्वस्वाचा त्याग केला आणि ते उत्तर दिशेस जाऊं लागले. तेव्हां पुत्र-विरहानें दुःखित झालेले जे व्यास-महामुनि त्यांनीं त्यास 'अरे बाळा !' म्हणून मोठ्या कळवळ्यानें हाक मारली. शुकाचार्य हे सर्वव्यापी असल्यामुळें त्यांनीं वृक्षांकडूनच आपल्या पित्याला उत्तर देखविलें ! सूत म्हणतात, अशा शुकाचार्यांना मी नमस्कार करतों ॥ २ ॥

ज्या शुकाचार्यांनीं दयाळू होऊन स्वतःच्या अनुभवानें ओतप्रोत भरलेलें व सर्व वेदांचें सार ज्यांत वर्णिलें आहे असें, आणि अज्ञानरूपी अन्धःकारांतून पार पडण्याची इच्छा करणाऱ्या संसारी प्राणिमात्रांस वेदान्त-ज्ञानानें प्रकाश देणारें असें पुराणांतील मुख्य गूढ तत्त्व सांगून दिलें, त्या ऋषिश्रेष्ठ व्यासपुत्र शुकाचार्याला मी शरण आलों आहें ॥ ३ ॥

पुरुषोत्तम असा जो नारायण त्या नारायणाला आणि सर्व पुरुषांत श्रेष्ठ अशा नराला आणखीहि वाणीची देवता जी सरस्वती त्या सरस्वतीदेवीला नमस्कार करून मग ग्रंथाला प्रारंभ करावा ॥ ४ ॥

ऋषि हो ! आपण मला जो प्रश्न केला तो फारच उत्कृष्ट आहे. कारण तो श्रीकृष्णचरित्र सांगण्याविषयीं असल्यामुळें मोठा लोककल्याणकारक आहे. कल्याण म्हणजे हेंच कीं, कृष्णचरित्र श्रवण केलें असतां आधीं अंतःकरणाचें समाधान होतें ॥ ५ ॥

श्रीकृष्णाच्या ठिकाणीं भक्ति उत्पन्न होणें हाच मनुष्याचा सर्वांत श्रेष्ठ धर्म होय. आणखी तीच भक्ति निर्हेतुक-निष्काम-अशी असली तर त्यासारखा श्रेष्ठ धर्म दुसरा कोणताच नाहीं. कारण, अंतःकरणाचें खरेंखरें समाधान होण्याला तिच्याशिवाय दुसरा मार्गच नाहीं ॥ ६ ॥

प्रथम त्या कृष्ण परमात्म्याच्या ठिकाणीं भक्ति उत्पन्न होऊन लौकरच वैराग्य प्राप्त होतें आणि मग त्या वैराग्यापासून उपनिषदांत सांगितलेलें नैष्कर्म्य सिद्धि प्राप्त करून देणारें ज्ञान प्राप्त होतें ॥ ७ ॥

मनुष्यानें धर्माचरण करून एखादें कर्म केलें आणि त्यापासून जर परमात्म्याच्या कथा ऐकण्याविषयीं आवडच उत्पन्न होत नसेल तर ती यातायात निखालस व्यर्थ होय, असेंच समजलें पाहिजे ॥ ८ ॥

धर्माचरणाचें मुख्य फल म्हणजे मोक्ष, असें असतां त्याचें द्रव्यप्राप्तीसारखें क्षुद्र फल समजणें हें योग्य नाहीं. द्रव्याचा मुख्य उपयोग धर्म घडावा हा आहे. द्रव्य ही उपभोग्य वस्तु नव्हे ही गोष्ट लक्षांत ठेवावी ॥ ९ ॥

उपभोग्य वस्तुप्राप्तीचें फळ केवळ शरीर धारण करणें येवढेंच आहे. इंद्रियांना संतुष्ट करावें हें कांहीं त्याचें फळ नव्हे. जन्माचा उपयोग तरी हाच कीं, तत्त्वज्ञानाची इच्छा करणें. नाना प्रकारचीं कर्में करून स्वर्ग प्राप्त करून घ्यावा हाच काय तो धर्मकर्मांचा उपयोग असें म्हणणें योग्य नव्हे ॥ १० ॥

अद्वितीय असें जें एक परब्रह्म आहे, त्यालाच तत्त्व असें म्हणतात. अपरोक्ष ज्ञान तें तेंच होय. त्यालाच कोणी ब्रह्म म्हणतात; कोणी परमात्मा म्हणतात व कोणी भगवान् असाही शब्द लावतात ॥ ११ ॥

परमेश्वरावर निस्सीम श्रद्धा ठेवणारे जे मुनिवर्य आहेत, तेच ज्ञान व वैराग्य आणि पुष्कळ शास्त्रें वाचून ह्यांच्या योगानें अंगीं जी बाणलेली निस्सीम भक्ति हिच्या योगानें आत्म्याच्या ठिकाणींच आत्म्याला पाहतात ॥ १२ ॥

ह्याकरितां ऋषिश्रेष्ठ हो ! पुरुषांनीं वर्णाश्रमधर्मांच्या विभागाप्रमाणें आचरण करून सिद्धि मिळविणें म्हणजेच परमेश्वराला संतुष्ट करणें होय ॥ १३ ॥

म्हणून नित्य एकाग्र अंतःकरणानें त्या भक्तसंरक्षक प्रभूचे गुण श्रवण करावेत; त्याचें कीर्तन करावें; त्याचेंच ध्यान करावें व त्याचेंच पूजन करावें ॥ १४ ॥

कोणतेंही कर्म केलें कीं अंतःकरणांत असलेली कर्मसंबंधीं गांठ अधिकच घट्ट होते; म्हणून विद्वान् पुरुष परमेश्वराच्या ध्यानरूप तरवारीनें कर्मांची गांठ कापून काढतात. असें ज्या परमेश्वराचें सामर्थ्य, त्याच्या कथांवर कोणता पुरुष प्रेम करणार नाहीं बरें ? ॥ १५ ॥

ब्राह्मण हो ! पुण्यपावन तीर्थांच्या सेवनानें साधुसंतांची सेवाही घडते. साधुसंतांची सेवा घडली म्हणजे धर्माविषयीं श्रद्धा वाढते. धर्मश्रद्धा वाढली म्हणजे परमेश्वराच्या कथा ऐकाव्याशा वाटतात. त्या ऐकल्या म्हणजे त्यांची आवडही वाढतच जाते ॥ १६ ॥

ज्याच्या गुणांचें श्रवण व कीर्तन पुण्यकारक आहे असा व भक्तांवर प्रेम करणारा श्रीकृष्ण, आपल्या कथा श्रवण करणाऱ्या भक्तांच्या हृदयांत वास्तव्य करून त्यांचीं पातकें नाहीशीं करतो ॥ १७ ॥

अशी भगवद्भक्तांची निरंतर सेवा करीत राहिलें म्हणजे अंतःकरणांतील कामक्रोधादि वासनारूप पातकें बहुधा नष्टप्राय होतात आणि पुण्यकीर्ति जो भगवंत त्याच्या ठिकाणीं अचल भक्ती उत्पन्न होते ॥ १८ ॥

असें झालें म्हणजे रजोगुण व तमोगुण आणि त्यांपासून उत्पन्न होणारे काम, क्रोध, लोभादि जे विकार त्यांच्या योगानें चित्ताला कोणत्याहि प्रकारची विकृति न होतां ते सत्त्व गुणामध्यें स्थिर होऊन त्याला समाधान प्राप्त होतें ॥ १९ ॥

अशा प्रकारें भगवद्भक्तीच्या योगानें अंतःकरण प्रसन्न झालें म्हणजे त्या पुरुषाची आसक्ति सुटते आणि त्याला भगवत्तत्त्वाचें खरेंखरें ज्ञान प्राप्त होतें ॥ २० ॥

स्वस्वरूप ईश्वराचें आत्म्यामध्यें साक्षाद्दर्शन झालें म्हणजे त्या पुरुषाचा हृदयांतील कर्मग्रंथी तुटतो, सर्व संशय नष्ट होतात, त्याच्या सर्व कर्मांचाही लय होतो ॥ २१ ॥

म्हणून ज्ञाते असतात ते निरंतर मोठया आनंदानें वासुदेव जो परमात्मा त्याची भक्ति करतात. त्या भक्तीच्या योगानें त्यांचें अंतःकरण शुद्ध होतें ॥ २२ ॥

सत्त्व, रज आणि तम हे प्रकृतीचे गुण आहेत आणि पुरुषोत्तम परमात्मा हा वस्तुतः एक असतां ह्या जगाची उत्पत्ति, पालन व संहार व्हावा यासाठीं अनुक्रमें तीन गुणांचा स्वीकार करून विष्णु, ब्रह्मदेव आणि शंकर अशीं नामें धारण करतो. त्या तिहींमध्यें भगवान् श्रीकृष्ण ही सात्त्विक मूर्ति होय व त्यापासूनच मनुष्यांचें कल्याण होतें ॥ २३ ॥

पृथ्वीच्या गुणानें युक्त अशा काष्ठापेक्षां ज्याप्रमाणें धूर हा श्रेष्ठ व त्या धुराहून तीन वेदांनीं ओतप्रोत व्यापलेला अग्नि हा श्रेष्ठ त्याचप्रमाणें तमोगुणाहून रजोगुण व रजोगुणाहून सत्त्वगुण श्रेष्ठ, कीं, ज्या सत्त्वागुणामुळें ब्रह्मदर्शन होतें ॥ २४ ॥

पूर्वींचे मोठमोठे ऋषि षड्गुणैश्वर्यसंपन्न व सत्त्वगुणैकमूर्ति जो भगवान् श्रीकृष्ण-परमात्मा त्याचीच भक्ति करीत असत. ह्याकरितां या संसारामध्येंही जे कोणी त्यांचेंच अनुकरण करून त्या परमेश्वराचीच भक्ति करतील, त्यांचेंही कल्याणच होईल ॥२५॥

परंतु मोक्षाची इच्छा करणारे जे लोक असतात, ते भूत, पितर, पिशाच्च अशीं भेसूर दैवतें सोडून देऊन शांत अशा नारायणस्वरूपाचेंच भजन करतात. तरीसुद्धां ते भूतपिशाच्चांची कधीं निंदा करीत नाहींत ॥ २६ ॥

ज्यांच्या स्वभावांत रजोगुणाचें किंवा तमोगुणाचें प्राबल्य असतें व जे समबुद्धीचे असतात तेच लोक भूत, पितर, पिशाच्च इत्यादिकांची आराधना करतात. कारण ते द्रव्य, ऐश्वर्य किंवा संतति एवढ्याचीच इच्छा करतात ॥ २७ ॥

सर्व वेद ईश्वरपर म्हणजे वासुदेवपर आहेत; तसेंच यज्ञ सुद्धां वासुदेवाच्या प्राप्तीकरितांच असतात; योग झाले तरी तेही वासुदेवपरच आहेत आणि सर्व कर्मेंहि भगवत्प्राप्तीचींच साधनें होत ॥ २८ ॥

ज्ञान तरी तें वासुदेवपरच आहे. तप आचरण करतात तेंही वासुदेवाप्रीत्यर्थच करतात. धर्म झाला तरी तो वासुदेवपरच असतो व स्वर्गादि गति ह्याहि वासुदेवपरच आहेत ॥ २९ ॥

खरोखर पाहिलें तर परमेश्वर हा निर्गुण व निराकार आहे. तरी त्या भगवंतानें आपल्या त्या सद्रूप व असद्रूप अशा व त्रिगुणरूपी मायेच्या योगानें पूर्वींच हें जग निर्माण केलेलें आहे; म्हणूनच पूर्वोक्त सर्व कर्में ईश्वरस्वरूप आहेत असें म्हटलें आहे ॥ ३० ॥

त्या मायेच्या योगानें उत्पन्न झालेल्या वस्तुमात्रामध्यें त्याची व्यापकता दिसल्यामुळें व गुणांमध्येंही त्याचा संचार असल्यामुळें तो परमेश्वरही त्रिगुणात्मकच आहे असें मनाला भासतें; परंतु वास्तविक त्रिगुणांशीं त्याचा कांहींएक संबंध नाहीं. तो ह्या तीन गुणांहून निराळाच आहे. तो स्वतः अपरोक्ष ज्ञानरूप असतांही 'हे पदार्थ माझ्या आधीन आहेत' असा 'अभिमानी' असल्यासारखा भासतो; परंतु खरोखर तो निरभिमानीच आहे ॥ ३१ ॥

ज्याप्रमाणें अग्नि पाहूं गेलें तर एकच आहे; पण तोच आपल्या प्रगटित स्थळीं म्हणजे लांकडामध्यें शिरून दिसूं लागला असतां तो लांकडांच्याच आकारमानाप्रमाणें भिन्नभिन्न आकाराचा दिसूं लागतो. लांकूड लांबट असलें तर निखाराही लांबट दिसतो. लांकूड चौकोनी असलें तर निखाराही चौकोनी दिसतो. त्याप्रमाणेंच विश्वस्वरूपी परमेश्वरही प्राणिमात्रांच्या अंतर्यामीं शिरून प्रगट झाला असतां निरनिराळ्या प्राण्यांच्या आकारांप्रमाणें व स्वरूपांप्रमाणें निरनिराळ्या स्वरूपांचा असल्याप्रमाणें भासतो ॥ ३२ ॥

सूक्ष्म भूतें, इंद्रियें आणि मन हीं त्रिगुणांचीं कार्यें होत. त्यांच्या योगानें परमेश्वर स्वतःच हे प्राणिमात्र निर्माण करतो आणि त्यांच्यामध्यें प्रवेश करून त्या भूतांच्या गुणांच उपभोग घेतो ॥ ३३ ॥

जगत्कर्ता जो परमेश्वर तो देवांमध्यें इंद्र, ब्रह्मा, शंकर इत्यादि तिर्यक्योनीमध्यें मत्स्य, कच्छ, वराह इत्यादि; मनुष्यांमध्यें राम, कृष्ण इत्यादि अवतार घेऊन सत्त्वगुणाच्या योगानें सर्व लोकांचें प्रतिपालन करतो ॥ ३४ ॥

## दुसरा अध्याय समाप्त.

---

# अध्याय ३ रा

प्रथमारंभीं ब्रह्मांडगोल[1] निर्माण करावेत अशा इच्छेनें पंचमहाभूतें, अहंकार, मन वगैरे उत्पन्न करून परमेश्वरानें षोडशकलायुक्त[2] अशा पुरुषाचें स्वरूप धारण केलें. हाच सृष्टींतील षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा भगवंताचा[3] सर्व जगत् निर्माण करण्याच्या इच्छेनें उत्पन्न झालेला पहिला अवतार होय ॥ १ ॥

सर्व प्रजापतींमध्यें श्रेष्ठ जो ब्रह्मदेव तो प्रलयकाळीं उदकामध्यें निद्रित होऊन समाधिनिद्रा प्रगट करणाऱ्या भगवंताच्या नाभिकमलापासून उत्पन्न झाला. ॥ २ ॥

त्या भगवत्स्वरूपाच्या अवयवरचनेवरून ह्या चतुर्दशभुवनात्मक ब्रह्मांडाची कल्पना केलेली आहे. तेंच भगवंताचें अत्यंत शुद्धसत्त्वाचें स्वरूप होय ॥ ३ ॥

ह्या स्वरूपाला फक्त योगीच ज्ञानदृष्टीनें पाहतात. त्याला हजारों पाय, हजारों मांड्या, हजारों बाहू, हजारों मुखें असल्यामुळें हें अत्यंत

---

१. मनुष्यवस्ती असलेले गोल १४ असावेत, असा शोध पूर्वींच्या लोकांस लागलेला होता. ह्या लोकांना ते लोक 'चतुर्दश भुवनें' असें म्हणत. त्यांचीं नांवें :—

अतल, वितल, सुतल, तलातल, रसातल, महातल, पाताल, भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, सत्यम् हीं चौदा भुवनें

२. श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिह्वा, घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें; वाक्, हस्त, पाद, शिस्न, गुद, हीं पांच कर्मेंद्रियें; मन पंचमहाभूतें [ पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश ] ह्या सोळा कला.

३. **उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामागतिं गतिम् ।**
**वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥**

**अर्थ—** सर्व जगाची उत्पत्ति व प्रलय कसे होतात ? जग हें आलें कोठून ? व जाणार कोठें ? ज्ञान व अज्ञान ह्यांचीं स्वरूपे कशीं ? हें ज्याला समजतें, त्यालाच भगवान् असें म्हणतात. किंवा —

**ऐश्वर्यस्य समग्रस्य धर्मस्य यशसः श्रियः ॥**
**ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इतीरणा ॥**

**अर्थ—** सर्व ऐश्वर्य, धर्म, यश, संपत्ति, ज्ञान आणि वैराग्य ह्या सहांना भग असें म्हणतात. हे सहा गुण ज्याच्या ठिकाणीं वास्तव्य करतात तो भगवान्.

आश्चर्यजनक आहे. तसेंच त्याला हजारों मस्तकें, हजारों कान, हजारों डोळे व हजारों नाकें, आणखी त्याच्यावर हजारों किरीट, हजारों कुंडलें, सहस्रावधि वस्त्रभूषणें असल्यामुळें तें अत्यंत तेजःपुंज दिसतें ॥ ४ ॥

परमेश्वराचे अनेक अवतार ह्याच स्वरूपापासून उत्पन्न होतात व ह्याच स्वरूपांत अंतर्धान पावतात. असें हें स्वरूप अव्यय आहे; म्हणजे त्याला कोणताही विकार म्हणून कधीं होतच नाहीं. देव म्हणा, पशुपक्षी म्हणा कीं मनुष्य वगैरे म्हणा, ते सारे ह्याच स्वरूपापासून क्रमाक्रमानें उत्पन्न होतात ॥ ५ ॥

अशा प्रकारच्या ह्या परमेश्वरानें पुढें कौमारनामक सृष्टीमध्यें सनत्कुमाररूपी ब्राह्मण होऊन सतत व आचरण करण्यास कठीण अशा नैष्ठिक[1] ब्रह्मचर्यव्रताचें पालन केलें ॥ ६ ॥

यज्ञाधिपति असा जो परमेश्वर त्यानें पृथ्वी ही रसातळास गेली आहे असा विचार करून तिला वर काढण्याकरितां दुसऱ्या अवतारांत वराहाचें स्वरूप धारण केलें ॥ ७ ॥

आणखी त्याच परमेश्वरानें तिसरा अवतार घेतेवेळीं ऋषीच्या कुळामध्यें आर्षसृष्टींत[2] नारद नांवानें अवतार घेऊन ' पंचरात्रागम ' नांवाच्या वैष्णव तंत्राचा मार्ग सांगितला. ह्या तंत्रांत सांगितलेलीं कर्मे नैष्कर्म्यसिद्धि मिळवून देण्यास कारणीभूत होतात ॥ ८ ॥

पुढें परमेश्वरानें त्याच आर्षसृष्टीमध्यें धर्मऋषीची पत्नी जी कला, तिच्या उदरीं चौथा नरनारायणनामक अवतार धारण केला आणि प्रशान्तचित्तानें अत्यंत दुर्धर अशी तपश्चर्या केली ॥ ९ ॥

तत्त्वसमुदायांचा निर्णय प्रतिपादन केलेलें सांख्यशास्त्र कालगतीनें नष्ट झालें होतें. त्याच्या पुनरुज्जीवनासाठीं परमेश्वरानें महासिद्ध कपिलनामक पांचवा अवतार घेतला व आसुरी नामक ब्राह्मणाला सांख्यशास्त्राचा उपदेश केला ॥ १० ॥

त्याच परमेश्वरानें सहाव्या अवतारामध्यें अनसूयेच्या प्रार्थनेवरून[3] दत्तात्रेय नांवानें अत्रिऋषीच्या पुत्रत्वाला प्राप्त होऊन अलर्क, प्रह्लाद, हैहय, यदु इत्यादिकांना आत्मज्ञानाचा उपदेश केला ॥ ११ ॥

ह्या यज्ञ नांवानें परमेश्वरानें सातवा अवतार धारण केला, तो रुचिनामक ऋषीची भार्या जी आकूति तिच्या उदरीं झाला. त्या यज्ञानेंच आपण पुढाकार घेऊन यामनामक देवगणांसह स्वायंभुव मन्वंतराचें पालन केलें ॥ १२ ॥

---

१ ज्या ब्रह्मचाऱ्याला गृहस्थाश्रम म्हणून करावयाचाच नसतो, त्याला ' नैष्ठिक ब्रह्मचारी ' असें म्हणतात.

२ आर्षसृष्टि म्हणजे जींत नारदादि ऋषि उत्पन्न झाले ती. मराठी भाषेमध्यें अलीकडे 'आर्ष ' म्हणजे विचारशून्य असा अर्थ केला जातो. तो मात्र येथें घेऊं नये.

३ एकदां अनसूयेनें परमेश्वरापाशीं असा वर मागितला कीं, देवा ! मला तुझ्यासारखा पुत्र पाहिजे; पण परमेश्वरासारखा दुसरा पुत्र होणें शक्य नाहीं, म्हणून त्यालाच अवतार घेणें भाग पडलें.

तो परमेश्वर आठव्या म्हणजे ऋषभ अवतारांत विवेकी पुरुषांचा मार्ग दाखविण्याकरितां नाभिराजापासून त्याची पत्नी जी मेरुदेवी, तिच्या उदरीं जन्मास आला. त्यानें दाखविलेला मार्ग सर्व आश्रमांस मान्य आहे ॥ १३ ॥

ऋषींनीं प्रार्थना[1] केल्यावरून भगवंतांनीं नववा पृथुराजाचा अवतार धारण करून पृथ्वीपासून नाना प्रकारच्या औषधी मिळविल्या म्हणूनच हा पृथूचा अवतार अत्यंत सुंदर म्हणून म्हणतात ॥ १४ ॥

परमेश्वरानें दहावा अवतार घेतला तो चाक्षुषनामक मन्वंतरामध्यें घेतला होता. त्या वेळीं मोठा जलप्रलय[2] होऊन सर्व समुद्र एकवटले होते. अशा वेळीं भगवंतांनी मत्स्यावतार धारण करून वैवस्वतमनूला पृथ्वीरूप नौकेंत बसवून त्याचें संरक्षण केलें ॥ १५ ॥

पूर्वी देवांनीं व दैत्यांनीं अमृत मिळविण्याकरितां मंदर पर्वताची रवी करून समुद्राचें मंथन केलें होतें. तेव्हां भगवंतांनीं कूर्मरूपानें अकरावा अवतार धारण करून तो मंदर नांवाचा पर्वत आपल्या पाठीवर धरला ॥ १६ ॥

धन्वंतरी हा बारावा अवतार होय. समुद्रमंथनामुळें निघालेलें अमृत समुद्रांतून वर काढण्यासाठीं परमेश्वरानें हा धन्वंतरीचा अवतार घेतला होता. तेरावा अवतार मोहिनी[3] नांवाची स्त्री हा होय. ह्या मोहिनीनें दैत्यांस भुरळ घालून देवांना प्राशन करण्याकरितां अमृत दिलें ॥ १७ ॥

---

१ वेन राजाच्या पश्चात् ह्याच्या राज्याला कोणी वारस नव्हता. त्यामुळें पृथ्वीवर दुष्ट लोक उपद्रव करतील, अशा भीतीनें ऋषींनीं परमेश्वराची प्रार्थना केली कीं आम्हांस कोणी तरी धर्मप्रतिपालक असा राजा द्यावा.

२ सत्यव्रताला माया दाखविण्याकरितां हा जलप्रलय केला होता. ही मोठ्या जलप्रलयाची कथा प्रत्येक धर्माच्या आद्य ग्रंथांत असलेली आढळून येते. बायबलमध्येंहि असा आद्यकालीं जलप्रलय होऊन नोवाला परमेश्वरानें कांहीं पशूंसहवर्तमान नौकेंत बसवून वाचविल्याची कथा आहे. कुराणांत, तसेंच चीन, जपान इत्यादिकांच्या धर्मपुस्तकांत अगदी हुबेहुब अशाच धर्तीच्या कथा आहेत.

३ समुद्रमंथन करून अमृत काढल्यानंतर तें परमेश्वर, मोहनीचें रूप घेऊन देवांस वांटून देऊं लागले. त्यांत राहू नांवाचा दैत्य कपटवेषानें येऊन देवांत बसला होता. मोहनीनें सर्व देवांच्या हातांवर अमृत घातलें, त्याप्रमाणें राहूच्याही हातावर अमृत घातलें व राहूनें त्याचा घोंटही घेतला. इतक्यांत चंद्र व सूर्य जवळ होते. त्यांच्या ती गोष्ट लक्षांत येऊन त्यांनीं मोहनीस खुणाविलें. त्याबरोबर मोहनीच्या हातांत खड्ग होतें त्यानें त्या राक्षसाचा तिनें तत्काल शिरच्छेद केला. त्यामुळें शिराचा ' राहू ' व धडाचा ' केतू ' असे दोन राक्षस सजीव होऊन हल्लीं ते चंद्रसूर्यांनीं आपली चहाडी केली म्हणून ग्रहणाच्या

त्यानंतर परमेश्वरानें चौदावा नरसिंहाचा अवतार धारण करून बुरूड ज्याप्रमाणें एखादा लव्हाळा चिरून टाकतो, त्याप्रमाणें त्यानें उन्मत्त झालेल्या हिरण्यकशिपू राक्षसाचें वक्षःस्थळ विदारण केलें ॥ १८ ॥

'त्रिपाद भूमि दे' म्हणून याचना करून त्रैलोक्याला हिरावून घेण्याची इच्छा धरणारा वामन ह्या नांवाचा पंधरावा अवतार बलिराजाच्या यज्ञांत गेला ॥ १९ ॥

सोळाव्या अवतारांत राजे ब्राह्मणांचा द्वेष करूं लागले असें पाहून ईश्वरानें परशुराम नांवानें अवतार धारण करून क्रोधयुक्त अंतःकरणानें एकवीस वेळां निःक्षत्रिय पृथ्वी केली ॥ २० ॥

तदनंतर उत्तरोत्तर लोक अल्पबुद्धि होत चालले व त्यांच्यानें सर्व वेदांच्या पठणाचें काम झेपेना असें पाहून परमेश्वरानें सत्यवतीच्या उदरीं पराशरऋषींपासून व्यास नांवानें अवतार धारण केला व त्या वेदरूप वृक्षाचीं खंडें करून सोडलीं; म्हणजे लहान लहान शाखा केल्या ॥ २१ ॥

त्यानंतर देवांच्या इष्ट कार्याकरितां नृपतिरूपानें रामचंद्राचा [1] अवतार धारण करून समुद्रावर सेतु बांधणें इत्यादि अनेक अद्भुत पराक्रम केले ॥ २२ ॥

भगवंतांनीं एकोणिसावा व विसावा हे दोन अवतार यादवकुलामध्यें धारण केले; ते बळराम व कृष्ण हे होत. त्यांनीं मोठमोठे अद्भुत पराक्रम करून पृथ्वीस झालेला भार दूर केला ॥ २३ ॥

ह्यापुढें [1] आतां कलियुगास प्रारंभ होईल व त्यांत दैत्य हे प्रबळ होऊन देवांचा अतिशय द्वेष करतील. त्यांचा उच्छेद करण्यासाठीं गया प्रांतामध्यें अजनवंशांत बुद्ध ह्या नांवानें भगवान् अवतीर्ण होऊन आपलें कार्य करील ॥ २४ ॥

तदनंतर ह्या सृष्टीचा पालनकर्ता जो परमेश्वर तो हें युग समाप्त होण्याचे वेळीं बहुतेक राजेलोक चोरासारखे प्रजेस लुटूं लागले असतां विष्णुयश ह्या नांवाच्या ब्राह्मणापासून कल्कि नांवानें उत्पन्न होईल ॥ २५ ॥

---

रूपानें त्यांचा सूड घेत आहेत, अशी ही एक पौराणिक कथा आहे. नेवाशास 'मोहनीराज' म्हणून एका देवालयांत देव आहे, तोही मोहनीच्या अवताराचा दर्शक होय.

१ भस्मासुराप्रमाणें हिरण्यकशिपूनेंही देवास प्रसन्न करून घेऊन पूर्वीं वर मागून घेतला होता कीं, मला 'दिवसाहि मरण येऊं नये व रात्रींहि मरण येऊं नये. मनुष्यापासून असूं नये कीं पशूपासून असूं नये. तें शस्त्रानें येऊं नये किंवा अस्त्रानें येऊं नये. घरांत येऊं नये किंवा बाहेर येऊं नये.' ह्यास्तव ह्या वरांतील सर्व देणग्या कायम ठेवून मारण्यासाठीं नारसिंह अवताराची योजना केली. रात्रीं नको दिवसा नको, तर तिनीसांजा; मनुष्यापासून नको पशूपासून नको, तर नारसिंह; धड मनुष्य नव्हे व धड पशूही नव्हे. शस्त्रानें नको, तर नखांनीं! घरांत नको बाहेर नको, तर वळचणीखालीं! अशी भगवंतांनीं त्याच्या मरणाची तजवीज विलक्षण केली होती!

ज्याप्रमाणें कधीं न आटणाऱ्या अशा प्रचंड तलावापासून हजारों कालवे काढावेत त्याप्रमाणें सत्त्वगुणाचा सागर जो भगवान् विष्णु त्याचे अनंत अवतार जन्मास येतात ॥ २६ ॥

वसिष्ठासारखे ब्रह्मर्षि, नारदासारखे देवर्षि, विश्वमित्रासारखे राजर्षि, स्वायंभुव प्रभृति मनु, ब्रह्मदेवादिक देव, मनूंचे पुत्र, व मरीच्यादि प्रजापति हे सुद्धां सारे त्या परमेश्वराचे—विष्णूचेच—अंश म्हणजे कला होत ॥ २७ ॥

इतका वेळपर्यंत सांगितलेले सर्व अवतार परमेश्वराच्या अंशभूत कला होत; परंतु श्रीकृष्णपरमात्म्याचा अवतार मात्र साक्षात् परब्रह्मस्वरूपच होय. इंद्राच्या शत्रूंनीं म्हणजे दैत्यांनीं लोकांस उपद्रव दिला असतां, अशा प्रकारचे हे अवतार निर्माण होऊन त्या लोकांस सुखी करतात ॥ २८ ॥

जो पुरुष अंतर्बाह्य शुद्ध होऊन नित्य सायंकाळीं व सकाळीं हें भगवंताचें चरित्र भक्तिपूर्वक पठण करतो, तो दुःखसमूहापासून म्हणजे दुःखरूप संसारापासून मुक्त होतो ॥ २९ ॥

खरोखर निराकार व चैतन्यरूपी परमेश्वराचें हें स्वरूप मायेच्या सत्त्व, रज व तम ह्या तीन गुणांपासून उत्पन्न झालेल्या महत्तत्त्वादि तेवीस तत्त्वांनीं आत्म्यामध्यें कल्पित केलें आहे ॥ ३० ॥

ह्या स्थूल शरिराची परमात्म्याच्या स्वरूपावरच अज्ञान लोक कल्पना करतात. ती कशी ? ह्याला उदाहरण—ज्याप्रमाणें आपण म्हणतों कीं 'आकाशांत अभ्र आलें आहे.' तें खरोखर आकाशावर नसतें, तर वातावरणांतील वायूच्या थरावर असतें.

---

१ त्या वेळीं लंकेत रावण ह्या नांवाचा राजा होता. तो दैत्य असून अत्यंत प्रबळ असे. त्यानें सर्व देवांस आपआपल्या अधिकारांवरून काढून आपल्या कारागृहांत बंदींत घातलें होतें. त्यांस मुक्त करून त्यांच्या त्यांच्या अधिकारांवर त्यांस स्थापन करणें हेंच कार्य परमेश्वरानें रामावतार घेऊन केलें.

२ येथपर्यंत जे अवतार कथन केले ते भूतकालीन होते; परंतु यापुढचे अवतार भविष्यकालीन म्हणजे पुढें होणारे म्हणून आधींच सांगून ठेवले आहेत, हें उघड आहे. ह्यावरून गौतमबुद्धाच्या जन्माच्या पूर्वीं हें भागवत लिहिलें गेलें हें तर सिद्धच आहे आणि त्यांत वर्तविलेलें भविष्यही आतां खरें ठरलें आहे. बुद्धाचा अवतार झाला, ही गोष्ट इतिहासप्रसिद्धच आहे. मुळांत "अजनसुत" च्या ऐवजीं "जनसुत" व "जैनसुत" असेहि पाठ आढळतात. ह्याचा अर्थ जैनवंशांत, जैनकुलांत असाहि स्पष्ट होत आहे. जिन, जन व अजन. हीं तीनहि नांवें एकाचींच आहेत. आणखी तो 'कीकट' प्रदेशांत म्हणजे जेथें हल्लीं बुद्धगया आहे तेथें झाला. ह्यावरून आपल्या पुराणांत लिहिलेलीं भविष्येंही खरीं होतात असें म्हणावयास वाव मिळतो. मग 'कल्की 'चें भविष्य तरी खोटें होईल असें कसें म्हणावें ?

वायूमध्यें धूळ उडाली असतां वायु धूसरवर्णाचा भासतो; पण वस्तुतः धुळीचा वायूशीं कांहीं संबंध नसतो. धूसरधर्म पृथ्वीचा असून तो वायूचा नव्हे; परंतु प्रत्यक्ष दिसणारा जो वायूवरील धूसरधर्म तो केवळ आरोपित धर्म होय. त्याप्रमाणेंच परमेश्वरस्वरूपाची गोष्ट आहे. तें स्वरूपही मायात्मकच असतें; परंतु लोक अज्ञानानें तेंच परमेश्वरानें घेतलें आहे असें समजतात; परंतु परमेश्वर हा त्रिकालाबाधित, निर्गुण, निराकार व निर्विकारच आहे ॥ ३१ ॥

पण ह्याहूनही एक निराळा देह आहे. तो अगदीं अदृष्टपूर्व व अश्रुतपूर्व आहे. तो त्रिगुणरहित असतांही त्रिगुणात्मक आहे असें मानतात. हा देह म्हणजे अव्यक्त किंवा लिंगदेह होय. तोच भगवंताचें स्वरूप आहे असाही त्याच्यावर आरोप करतात; पण त्या जीवाला म्हणजे लिंगदेहाला पुनर्जन्म असलेला अनुभवास येतो ॥ ३२ ॥

आत्म्यामध्यें जेव्हां अज्ञानानें कल्पिलेलीं सत् म्हणजे सूक्ष्म व असत् म्हणजे स्थूळ अशीं दोन्ही स्वरूपें आत्मज्ञानाच्या योगें नाहींशीं होतील तेव्हांच खरें ब्रह्मविषयक ज्ञान होईल ॥ ३३ ॥

जर सर्वज्ञ व प्रकाशमान अशी त्रिगुणात्मक माया बुद्धिपूर्वक विराम पावेल तरच तो जीव पूर्णावस्थेस पोंचून स्वतःच्या माहात्म्यांत श्रेष्ठत्वाला पावेल. अर्थात् तो आत्मा सर्वत्र पूज्य होईल असें विद्वान् लोक समजतात ॥ ३४ ॥

विद्वान् लोक वर सांगितल्याप्रमाणें सर्वांच्या अंतर्यामीं राहणाऱ्या व कर्तृत्वादि उपाधि ज्याला नाहींत अशा व जन्ममरणादि विकार ज्याच्यावर होत नाहींत अशा परमेश्वराचीं वेदांत गूढरीतीनें जपून लिहिलेलीं जन्में म्हणजे मत्स्यादि अवतार व त्या त्या अवतारांत केलेलीं अनेक प्रकारचीं पराक्रमाचीं कृत्यें वर्णन करतात ॥ ३५ ॥

ज्याच्या सर्व अवतारादि क्रीडा यथार्थ लोकोपयोगी आहेत असा परमेश्वर ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति व संहार म्हणजे नाश हीं तीनही करतो; परंतु मी उत्पत्त्यादि करणारा आहें अशा प्रकारचा अभिमान बाळगून त्यांत आसक्ति ठेवीत नाहीं. हा पांच ज्ञानेंद्रियांचा व सहाव्या मनाचाहि स्वामी म्हणजे चालक असून सर्व प्राण्यांच्या हृदयांत गुप्तरीतीनें वास्तव्य करून स्वतंत्रपणानें शब्दादि ( शब्द, स्पर्श, रूप, रस व गन्ध ह्या ) पांच विषयांचा व सहाव्या संकल्पादि मनोविषयाचा सुद्धां उपभोग घेतो ॥ ३६ ॥

ज्याप्रमाणें अज्ञानी लोकांना नाटकी लोकांच्या सोंगांचें ज्ञान होत नाहीं; त्याप्रमाणेंच कुत्सित बुद्धीचा कोणताही प्राणी वाणीनें व मनानें अनेक प्रकारचीं नांवें व स्वरूपें धारण करणाऱ्या परमेश्वराच्या अवताररूपी अनेक पराक्रमी कृत्यांना कल्पनेनें सुद्धां जाणत नाहीं ॥ ३७ ॥

जो निष्कपट व नित्य चालणाऱ्या अशा आपल्या सद्वर्तनानें भगवंताच्या चरण-कमलाचा भुंग्याप्रमाणें आस्वाद घेतो, तोच संपूर्ण जगाला उत्पन्न करून त्याचें पोषण करणाऱ्या व पराक्रमी अशा चक्रपाणी भगवंताचें स्थान जाणून तें प्राप्त करून घेतो ॥ ३८ ॥

शौनकादि ऋषि हो ! खरोखर आपण ह्या बाबतींत सर्वज्ञ व कृतकृत्य आहां; कारण तुम्ही संपूर्ण लोकांचा स्वामी अशा परमेश्वराच्या ठिकाणीं ह्याप्रमाणें सर्वभावनेनें आपलेपणा ठेविला आहे. ईश्वराचे ठिकाणीं लीन झालें असतां पुनः जन्ममरणादि संसार-चक्रांत फिरावें लागत नाहीं ॥ ३९ ॥

यास्तव षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा महामुनि व्यासांनीं भगवंताच्या चरित्रानें ओथंबलेलें व ब्रह्मज्ञानानें ओतप्रोत भरलेलें असें हें भागवत-पुराण रचिलें ॥ ४० ॥

श्रीव्यासांनीं सर्वप्राणिमात्रांच्या कल्याणाकरितां लोकांना कृतार्थ करणारें तें वर सांगितलेलें हें मोठें भागवत-पुराण सर्वांस कल्याणाचा मार्ग समजावा म्हणून आत्मज्ञान-संपन्न अशा आपल्या मुलाला म्हणजे श्रीशुकाचार्यांना पढविलें. अर्थात् ह्या पुराणाचा त्यांच्या हृदयांत प्रकाश करविला म्हणजे हें त्याकडून घेवविलें ॥ ४१ ॥

संपूर्ण वेद व सर्व इतिहास ह्यांचें साररूप निवडून काढलेलें असें हें भागवत-पुराण सार्वभौम अशा परीक्षित् राजाला शुकाचार्यांनीं ऐकविलें ॥ ४२ ॥

परीक्षित् राजा ऋषींच्या सहवर्तमान गंगेच्या कांठीं मरणाच्याच उद्देशानें बसला असतां तेजस्वी अशा शुकाचार्यांनीं त्याला श्रीमद्भागवत सांगण्यास प्रारंभ केला ॥ ४३ ॥

त्या ठिकाणीं श्रीशुकाचार्यांच्या कृपेनें मी बसलों असतां श्रीमद्भागवताचें अध्ययन केलें आणि तोच मी तुम्हांला यथाशक्ति जसें अध्ययन केलें तसेंच ऐकविणार आहें ॥ ४४ ॥

धर्म व ज्ञान ह्या दोहोंशी सहवर्तमान श्रीकृष्ण स्वतःच्या लोकाला म्हणजे स्वर्गाला गेला असल्यामुळें ह्या कलियुगांत सांप्रत जिकडे तिकडे अज्ञान व अधर्म ह्यांचा अंधकार पसरत चालला आहे. असें पाहून श्रीमद्भागवत–पुराणरूपी हा सूर्य उदयास आलेला आहे ॥ ४५ ॥

**तिसरा अध्याय समाप्त**

# अध्याय ४ था

व्यास म्हणतात, पुष्कळ दिवसपर्यंत चालू राहणाऱ्या यज्ञाला ज्यांनीं प्रारंभ केला आहे, अशा ऋषींमध्यें मुख्य व वयानेंहि जे अतिशय वृद्ध अशा ऋग्वेदी शौनक[1] नांवाच्या ऋषींनीं 'मी तुम्हांला भागवत सांगतों' असें म्हणणाऱ्या सूतांची स्तुति करून बोलण्यास प्रारंभ केला ॥ १ ॥

शौनक म्हणतात, अहो सूत हो! अहो सूत हो!! आपण मोठे भाग्यवंत आहां आणि तसेंच आपण वक्त्यांमध्येंहि श्रेष्ठ आहां. ह्याकरितां भगवान् श्रीशुकाचार्यांनीं श्रीमद्भागवताबद्दलची जी पुण्यकारक कथा सांगितली तीच आपण आम्हांस सांगावी ॥ २ ॥

ह्या कथेला प्रारंभ कोणत्या युगांत म्हणजे कोणत्या काळांत, कोणत्या ठिकाणीं व काय कारणास्तव झाला? ज्या श्रीमद्वेदव्यासांनीं ही भागवतसंहिता तयार केली त्याला ही तयार करण्याबद्दल कोणी उपदेश केला? ॥ ३ ॥

त्या श्रीमद्वेदव्यासांचा मुलगा श्रीशुकाचार्य, मोठा योगसाधनसंपन्न, समदृष्टि ठेवणारा, भेदभावरहित, सर्वत्र ब्रह्मरूप अवलोकन करणारा व नेहमीं जागा राहणारा म्हणजे अज्ञानरूपी अंधकारांत झोप घेऊन लोळत न पडणारा व ज्याचें ज्ञान बाह्यात्कारी दिसत नसल्यामुळें जो सर्वांना वेड्याप्रमाणें भासविणारा असा असतांसुद्धां त्यांनीं परीक्षित राजाला श्रीमद्भागवत सांगितलें हें कसें संभवतें? ॥ ४ ॥

एके दिवशीं असें झालें कीं, नग्न असे व्यासपुत्र श्रीशुकाचार्य पुढें चालले होते व त्यांच्या मागोमाग स्वतः व्यास वस्त्रें वगैरे परिधान करून जात होते. वाटेंत एका सरोवरांत देवांगना नग्न होऊन स्नान करीत होत्या. त्यांनीं श्रीव्यासांना जवळ आलेले पाहून लाजेनें वस्त्रें नेसलीं; पण पुढें गेलेल्या नग्न व तरुण अशा श्रीशुकाचार्याला पाहून लाजेनें त्या वस्त्रें नेसल्या नाहींत, हें आश्चर्य पाहून श्रीव्यासांनीं देवांगनांना विचारलें असतां त्या म्हणतात कीं, हे व्यास! तुझ्या ठिकाणीं स्त्री व पुरुष हा भेदभाव आहे, पवित्र दृष्टीच्या तुझ्या मुलाच्या ठिकाणीं हा भेदभाव नाहीं!' ॥ ५ ॥

---

१ कोणी अशी शंका घेतील कीं, तेथें पुष्कळ ऋषी बसले असतां शौनकावरच सूतांना प्रश्न विचारण्याची पाळी कां प्राप्त झाली? तर त्याचें निराकरण व्यासांनीं 'वृद्धः' व 'बह्वृचः' अशीं दोन शौनकांना विशेषणें देऊन केलें आहे. तेथें बसलेल्या अनेक ऋषींमध्यें शौनकाइतका वयोवृद्ध दुसरा कोणीहि नव्हता; म्हणून शौनकाला सर्व ऋषींनीं पुढारी बनवून त्यालाच बोलण्याबद्दल सुचविलें; तसेंच चारही वेदांत ऋग्वेदाला प्राधान्य असल्यामुळें व हा शौनक, प्रधान जो ऋग्वेद त्याचा ज्ञाता असल्यामुळेंहि ह्या शौनकालाच त्यांनीं अग्रेसराचा मान देऊन तद्द्वारा सर्व भागवतग्रंथाचें श्रवण केलें.

प्रथमतः श्रीशुकाचार्य कुरुदेश व जांगलदेश ह्या दोन देशांत प्राप्त होऊन तेथून हस्तिनापुरांत वेड्याप्रमाणें, मुक्याप्रमाणें व दारुड्याप्रमाणें फिरत असतां तेथील लोकांनीं त्याला कसें ओळखलें व कोणत्या दृष्टीनें कसें त्याजकडे पाहिलें ? ॥ ६ ॥

बाबा सूता ! अथवा पांडवांच्या कुळांत उत्पन्न झालेल्या परीक्षित् राजाचें श्रीशुकाचार्याबरोबर कसें भाषण झालें, ज्या भाषणामुळें श्रीमद्भागवतपुराणाची संहिता उपलब्ध झाली ॥ ७ ॥

कारण तो महाभाग्यवान् श्रीशुकाचार्य गृहस्थाश्रमी लोकांचीं घरें पवित्र करीत करीत गाईची धार काढण्यास जितका वेळ लागतो तितका वेळपर्यंतच त्यांच्या घरीं उभा राहत असे ॥ ८ ॥

हे सूता ! सर्व लोक अभिमन्यूच्या मुलाला म्हणजे परीक्षित् राजाला मोठा भगवद्भक्त व कट्टा वैष्णव असें समजतात; करितां त्याचें अत्यंत आश्चर्यकारक जन्म व त्याचीं फारच आश्चर्यजनक कृत्यें आम्हांला सांगा ॥ ९ ॥

किंवा पांडवांचें महत्त्व वाढविणारा असा तो सार्वभौम परीक्षित् राजा, एवढ्या मोठ्या सार्वभौम अशा राज्यलक्ष्मीला झिडकारून गंगेच्या कांठीं काय कारणास्तव मरण्याकरितां बसला तें सांगा ॥ १० ॥

खरोखर शत्रूसुद्धां स्वतःच्या कल्याणाकरितां ज्या परीक्षित् राजाच्या चरणांशीं पुष्कळ द्रव्य आणून त्यास नमस्कार करीत व शरण जात अशा योग्यतेच्या ह्या पराक्रमी व तरुण राजानें तरुणपणीं टाकण्यास कठीण अशा राज्यलक्ष्मीला, एवढेंच नव्हे तर स्वतःच्या प्राणाला सुद्धां टाकण्याची इच्छा कां केली तें सांगा ॥ ११ ॥

जे भगवंताची भक्ति करणारे लोक आहेत ते लोकांच्या कल्याणाकरितां व लोकांस ऐश्वर्यप्राप्ति व्हावी एवढ्याकरितां व त्यांस अनेक प्रकारचे उपदेश करण्याकरितां जगतात, स्वतःकरितां कधींहि जगत नाहींत, असें असतां ह्या परीक्षित् राजानें विरक्त होऊन लोकोपयोगी असें आपलें शरीर कां टाकलें तें सांगा ॥ १२ ॥

ह्याबद्दल आम्ही आपणांला जें कांहीं विचारलें आहे, तें सर्व आपण आम्हांला सांगावें वेदांव्यतिरिक्त इतर बाबतींत व वक्तृत्वकलेंत आपण अत्यंत कुशल आहां असें मी मानतों ॥ १३ ॥

सूत म्हणतात:—कृत, त्रेत, द्वापर व कलि ह्या युगांच्या क्रमाक्रमानें तिसरें द्वापर युग प्राप्त झालें असतां भगवंताच्या अंशानें पराशरापासून सत्यवतीच्या ठिकाणीं व्यास नांवाचा एक महर्षि उत्पन्न झाला ॥ १४ ॥

तो व्यास कोणे एके दिवशीं सकाळीं सूर्योदय झाला असतां सरस्वती नदीच्या काठीं येऊन शुद्ध जलानें आचमन व संध्या-वंदनादि नित्य कृत्य करून एकटाच एकांतस्थळीं बसला ॥ १५ ॥

सर्वज्ञ असे ते महामुनि वेदव्यास, सतत मोठ्या वेगानें चालणाऱ्या काळानें ह्या पृथ्वीवर युगायुगांत युगधर्मांचा ह्रास होत आहे; म्हणजे धर्मसंकर होत आहे, असें पाहून, व ॥ १६ ॥

त्या धर्मसंकरामुळें पंचभौतिक शरीरांच्या शक्तिहि नष्ट झाल्या आहेत व सर्व प्राणी श्रद्धारहित, निर्बल, अज्ञानी व अल्पायु झाले आहेत, असें पाहून, व ॥ १७ ॥

विचार करण्याची शक्ति असणारे ते मुनि वरील सर्व परिस्थिति लक्षांत घेऊन व ज्ञानदृष्टीनें सर्व लोक दुर्दैवानें व्यापिलेले आहेत असेंहि पाहून चारहि वर्ण व आश्रम ह्यांचें ज्यायोगें कल्याण होईल अशाबद्दल विचार करूं लागले ॥ १८ ॥

चारहि ऋत्विज ज्या वैदिककर्मांमध्यें असतात असें हें कर्म लोकांच्या अंतःकरण-शुद्धीला फार उपयोगी आहे, असें पाहून व्यासांनीं यज्ञांची वाढ करण्याकरितां एका वेदाचे चार भाग केले ॥ १९ ॥

वेदाचे ते पूर्वोक्त चार भाग ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद ह्या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. इतिहास[1] व पुराणें[2] ह्यांना पांचवा वेद असें म्हणतात ॥ २० ॥

त्यांमध्यें पैल नामक ऋषीनें ऋग्वेदाचें अध्ययन केलें. विद्वान् अशा जैमिनीनें सामवेदाचें अध्ययन केलें व एकटा वैशंपायनच यजुर्वेदांत निपुण झाला ॥ २१ ॥

उग्रमूर्ति असा सुमंतु नांवाचा मुनि अथर्ववेदांत निष्णात झाला व माझे वडील रोमहर्षण इतिहास व पुराणें ह्यांत पारंगत झाले ॥ २२ ॥

ते हे पैलादि चार ऋषि आपआपल्या वेदांचे अनेक भाग करून शिष्यपरंपरेनें पुढें त्यांना शिकविते झाले. ते पुढील सर्व वेद आश्वलायन, हिरण्यकेशी, आसुरायणीय, पैप्पल, दांत इत्यादि शाखांनीं प्रसिद्धीस आले ॥ २३ ॥

दयाळु अशा श्रीमद्वेदव्यासांनीं, अल्पबुद्धीच्या लोकांना सहजरीतीनें जसे शिकतां येतील तसे वेदाचे अनेक विभाग केले, त्यामुळें सर्वांस हे वेद शिकतां येतात ॥ २४ ॥

तीन वेद शिकण्यास व ऐकण्यास ज्यांना अधिकार नाहीं, अशा स्त्रियांना, शूद्रांना व भ्रष्ट झालेल्या ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांना व मूर्ख लोकांना कर्मकाण्डरूपी कल्याणाचा मार्ग सापडावा, एवढ्याकरितां श्रीव्यासांनीं विचार केला कीं, ह्यांतच त्यांचें कल्याण होईल. असें समजून दयाळूपणानें श्रीमन्महाभारत या नांवाचा मोठा इतिहासग्रंथ तयार केला ॥ २५ ॥

---

१ श्रीमन्महाभारताला इतिहास अशी संज्ञा आहे.

२ पुराणें एकंदर ५४ आहेत. पैकीं १८ महापुराणें, १८ उपपुराणें व १८ उपोपपुराणें. ह्या सर्व पुराणांचीं नांवें नारदपुराणांत कथानुक्रमणिकेसह दिलीं आहेत. हीं सर्व व्यासांनींच लिहिलीं आहेत.

अहो शौनकादि द्विज हो! याप्रमाणें नेहमीं सर्व प्राण्यांच्या कल्याणाकरितां सर्वतोपरी झटणाऱ्या श्रीमद्वेदव्यासांचें अंतःकरण जेव्हां श्रीमन्महाभारतासारख्या वेदरूप ग्रंथांचें प्रदर्शन करूनहि संतुष्ट झालें नाहीं ॥ २६ ॥

तेव्हां सरस्वती नदीच्या पवित्र तीरावर धर्मज्ञ असे श्रीमद्वेदव्यास खिन्नान्तःकरणानें युक्त होऊन एकांतांत विचार करीत बसले असतां पुढीलप्रमाणें त्यांच्या मनांत अनेक प्रकारचे विचार येऊं लागले ॥ २७ ॥

मीं अनेक प्रकारचीं व्रतें आचारण केलीं; वेद, गुरु व अग्नि यांचेंहि यथाविधि पूजनादिकांनीं आदरातिथ्य केलें आणि निष्कपटबुद्धीनें वेद, गुरु व अग्नि यांच्या आज्ञाहि शिरसामान्य केल्या ॥ २८ ॥

मी श्रीमन्महाभारताच्या मिषानें सर्व वेदांचा अर्थहि प्रदर्शित केला; ज्याच्या श्रवणपठणानें वेदांचा अधिकार नसणाऱ्या स्त्रीशूद्रादिकांना सुद्धां धर्मादिकांचें ज्ञान प्राप्त होतें ॥ २९ ॥

अरेरे!!! तरी सुद्धां ब्रह्मतेजानें युक्त अशा साधूंमध्यें श्रेष्ठ अशा माझ्या देहांत वास्तव्य करणारा सर्वव्यापी आत्मा स्वतः आपल्याला परिपूर्ण असतांही अपरिपूर्ण म्हणजे अकृतार्थ असें मानतो ॥ ३० ॥

अथवा खरोखर निष्काम भक्ति करणाऱ्या परमहंसांना प्रिय असे व भगवंतालाहि अत्यंत आवडते असे भागवत धर्म विशेषेंकरून मीं वर्णन केले नाहींत असें वाटतें ॥ ३१ ॥

ह्याप्रमाणें स्वतःला अकृतार्थ म्हणजे आपण कृतकृत्य झालों नाहीं असें मानून खिन्न मुद्रेनें बसणाऱ्या त्या व्यासमहर्षींच्या, पूर्वी सांगितलेल्या आश्रमामध्यें म्हणजे सरस्वती नदीच्या पवित्र तीरावर असणाऱ्या आश्रमांत नारदमुनि प्राप्त झाले ॥ ३२ ॥

आपल्या आश्रमाला नारदऋषि आले आहेत असें जाणून श्रीमद्वेदव्यास एकाएकीं उठून त्याला सामोरे गेले व देवांना पूज्य अशा देवर्षि नारदाची त्यांनीं यथाविधि पूजा केली ॥ ३३ ॥

**चौथा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ५ वा

सूत म्हणतात, शौनकादि ऋषि हो ! नंतर कीर्तिमान् असा नारदमुनि हातात वीणा धरून आसनावर स्वस्थ बसला असतां जवळच बसलेल्या वेदव्यासांना किंचित् मंद हास्य करून बोलला ॥ १ ॥

नारद म्हणतात, हे भाग्यवान् वेदव्यासा ! तुझा आत्मा व अन्तःकरण, तुझ्या आत्म्याच्या चिंतनानें, शरीराभिमानी व चित्ताभिमानी आत्मा आनंदित होतो का ? ॥२॥

ज्या ज्या कांहीं जाणण्यास योग्य अशा धर्मादि गोष्टी त्या सर्व तुला परिपूर्ण रीतीनें माहीत आहेत. ज्या ज्ञानामुळें वेदार्थानें ओतप्रोत भरलेलें असें तूं महाभारत तयार केलेंस ॥ ३ ॥

हे समर्थ व्यासा ! जाणण्यास योग्य अशी जी परब्रह्मवस्तु तिचें तूं उत्तम रीतीनें अध्ययन केलें आहेस व त्याचें तुला चांगलें ज्ञानहि पण झालें आहे. असें असतां सुद्धां मी अजून कृतकृत्य झालों नाहीं; अर्थात् माझ्यांत कांहीं तरी कमीपणा आहे असें समजून कां शोक करतोस ? ॥ ४ ॥

व्यास म्हणतात, तूं म्हणालास तितक्या सर्व गोष्टी जरी माझ्या ठिकाणीं आहेत तरीसुद्धां माझ्या आत्म्याला संतोष होत नाहीं; म्हणजे माझें चित्त अस्वस्थच आहे. असें होण्याचें कारण काय ? हें मी परिपूर्ण ज्ञानी व दुर्लभदर्शनाचा असा जो तूं ब्रह्मपुत्र नारद, त्या तुला विचारीत आहें ॥ ५ ॥

सत् व असत् ह्या उभय स्वरूपांचा स्वामी व कोठेंहि आसक्ति न ठेवणारा आणि तीन गुणांच्या योगें जगाची उत्पत्ति, स्थिति व प्रलय करणारा असा जो अनादि परमेश्वर, त्याची आपण उपासना केल्यामुळें आपणांला सर्व गुप्त गोष्टींचें ज्ञान आहे ॥ ६ ॥

आपण सूर्याप्रमाणें त्रैलोक्यांत फिरणारे आहां व शरिरांत संचार करणाऱ्या वायूप्रमाणें सर्वगामी आहां; तसेंच आत्म्याला प्रत्यक्ष रीतीनें पाहणारे आहां. ह्याकरितां आपण सदसद्रूप अशा ब्रह्मामध्यें पूर्णत्वाला पोंचलेल्या माझ्या ठिकाणीं, काय विशिष्ट कमीपणा आहे, तो शोधून काढा ॥ ७ ॥

नारद म्हणतात, आपण भगवंताच्या निर्मळ यशाला न वर्णिल्यामुळें आपल्या मनाची शांति झाली नाहीं व हाच आपल्या ज्ञानांत कमीपणा आहे, असें मला वाटतें ॥ ८ ॥

हे ऋषिश्रेष्ठ व्यासा ! आपण धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चारहि धर्मादि[१] पुरुषार्थांचें जसें वर्णन केलेंत तसें परमेश्वराचें वर्णन केलें नाहींत ॥ ९ ॥

---

१ धर्मादि म्हणजे धर्म आहे आदि अर्थात् मुख्य ज्यांत असे चार पुरुषार्थ होत; ते क्रमानें धर्म, अर्थ काम व मोक्ष ह्या नांवांनीं प्रसिद्ध आहेत.

ज्या भाषणांत उत्तम उत्तम चित्रविचित्र पदयोजना करूनसुद्धां जर त्या योगें जगाला पवित्र करणारें भगवंताचें सुंदर यश थोडें सुद्धां वर्णन केलें नसेल, तर त्या केवळ चित्रविचित्र पदयोजनांची कांहीं एक किंमत नाहीं. मानससरोवरांत राहणारे हंस पक्षी जसें काकतीर्थाला ( कावळ्याच्या तीर्थाला ) सेवीत नाहींत अगर तेथें रममाण होत नाहींत, तसें मनानें पवित्र असे परमहंस भगवद्भक्त, ज्या भाषणांत भगवद्गुणानुवाद नाहींत अशा चित्रविचित्र पदरचनांना पाहून सुद्धां तेथें रममाण होत नाहींत. म्हणजे त्यांकडे ढुंकून सुद्धां बघत नाहींत ॥ १० ॥

लोकांच्या पातकांचें नाशन करणारें जें भाषण तेंच खरें भाषण होय. त्या भाषणांत जरी प्रत्येक श्लोकामागें चित्रविचित्रपणा नसला तरी सुद्धां जर परमेश्वराचीं सुंदर नांवें व त्याची कीर्ति गायलेली असेल, तर साधु लोक त्याचें श्रवण व गायन करितात ॥ ११ ॥

नैष्कर्म्यसिद्धि प्राप्त करून देणारें व निर्मळ असें सुद्धां ज्ञान जर भवद्भक्तिरहित असेल तर तें तितकें शोभत नाहीं.असें असतां पुनः नेहमीं दुःख देणारें, अकल्याण करणारें व कर्मविषयक ज्ञान भगवंताला अर्पण केलेलें नसेल तर तें कसें शोभणार ? जरी तें जन्ममरणादि संसारापासून मुक्त करणारें असलें तरी त्याचें येथें महत्त्व नाहीं ॥ १२ ॥

अहो भाग्यवंत व्यास हो ! ह्यानंतर, ज्या आपलें अवलोकन व्यर्थ जाणारें नाहीं व आपण निर्मळ यश संपादन केलेलें आहे, तसेंच सत्यावर आपली प्रीति आहे; आणि आपण उत्तम उत्तम व्रतांचें आचरण केलेलें आहे, तेव्हां आपण सर्व जन्ममरणरूपी संसारबंधनांपासून लोकांना मुक्त करण्याकरितां एकाग्र अंतःकरणानें भगवंताच्या चरित्राचें स्मरण करावें ॥ १३ ॥

भगवच्चरित्राहून दुसरें कांहीं तरी सांगण्याची इच्छा करणाऱ्या व त्यायोगें उत्पन्न झालेल्या नामरूपादि भेदामुळें भेदबुद्धीनें पाहणाऱ्या अशा आपली बुद्धि अजून अस्थिर स्थितींतच राहिलेली आहे व अशीच जर ती कायम राहील तर वाऱ्यानें हलणाऱ्या होडीला जसा स्थानाभावामुळें अस्थिरपणा येतो त्याचप्रमाणें तुझी बुद्धि अस्थिर व अस्वस्थ होईल व तिला योग्य आश्रय मिळणार नाहीं ॥ १४ ॥

स्वाभाविक रीतीनें विषयांच्या ठिकाणीं प्रेम करणाऱ्या व धर्माकरितां म्हणून निंद्य अशा कर्ममार्गाला उपदिष्ट करणाऱ्या अशा आपल्याकडून हा एक मोठा अन्याय झालेला आहे. आपल्या मुखांतून निघालेलें जें वाक्य तोच धर्म अशी इतर सर्वांची कल्पना असल्यामुळें ती कल्पना नाहींशी होण्यास कांहीं एक मार्ग उरलेला नाहीं ॥ १५ ॥

विद्वान् व कुशल पुरुषच सर्वव्यापी व अनन्त अशा ह्या परमेश्वराच्या सुखरूप स्वरूपाला निवृत्तिमार्गाच्याच योगें जाणण्यास योग्य आहेत. ह्याकरितां आपण निर्गुण

असूनहि त्रिगुणाच्या योगें उत्पत्ति, स्थिति व प्रलय करणाऱ्या व निराकार अशा भगवंताचें चरित्र उत्तम रीतीनें दाखवावें; म्हणजे वर्णन करावें ॥ १६ ॥

समजा कीं, एखादा पुरुष स्वधर्म सोडून भगवंताची सेवा करीत असतां मध्येंच अपूर्ण स्थितींतच मरेल, तर त्या अर्धवट सेवा करून मेलेल्या पुरुषाचें कधीं तरी अकल्याण होईल काय ? तर कधींच अकल्याण होणार नाहीं. असें असतां भगवत्सेवा न करणारांस स्वधर्माचरणामुळे कोणतासा मोठा फायदा होणार आहे ? ॥ १७ ॥

वरखालीं फिरणाऱ्यांना म्हणजे उत्तम योनींत आणि अधम योनींत जन्म घेणाऱ्यांना जें सुख मिळत नाहीं, त्या सुखाकरितां प्रत्येक विद्वान् पुरुषानें प्रयत्न करावा. जर आपण तसा प्रयत्न केला नाहीं तर अत्यंत झपाट्यानें चालणाऱ्या कालगतीच्या योगें त्या आत्यन्तिक सुखाच्या ऐवजीं उलट तें सुख दुःखरूपानें परिणाम पावून त्यास दुःख देण्यास कारणीभूत होतें ॥ १८ ॥

अहो वेदव्यास हो ! जो पुरुष परमेश्वराची सेवा करतो तो कशाहि स्थितींत असला तरी साधारण पुरुषाप्रमाणें कधींहि संसाराला प्राप्त होत नाहीं. कारण ज्यापासून अनेक रसांची प्राप्ति होते, अशा भगवंताच्या चरणकमलाला आलिंगन देणारा व त्याचें नित्य स्मरण करणारा असा असल्यामुळें तो त्याला कधींहि टाकूं इच्छीत नाहीं ॥ १९ ॥

हें सर्व जग परमेश्वररूपच आहे; परंतु परमेश्वरापासून जगाची उत्पत्ति, स्थिति व लय हीं कार्यें होणारीं असल्यामुळें परमेश्वर जगाहून निराळा आहे हें सर्व आपण जाणतच आहां; तथापि उगीच दिग्दर्शनार्थ म्हणून टीचभर सांगून ठेविलें आहे ॥ २० ॥

व्यास हो ! आपणच स्वतः भगवान् परमेश्वराचे अंशभूत अवतारच आहां; हें स्वतः अंतःकरणाशीं स्वतःच्या आत्म्यासंबंधीं विचार करून निश्चित रीतीनें जाणा. आपला आत्मा हा अज म्हणजे जन्ममरणरहित असून लोकांच्या कल्याणाकरितां उत्पन्न झाला आहे. ह्याकरितां आपण, मोठा पराक्रम आहे ज्याचा अशा परमेश्वराचें चरित्र उत्तम रीतीनें वर्णन करावें ॥ २१ ॥

उत्तम आहे कीर्ति ज्याची अशा भगवंताच्या गुणांचें जें वर्णन करणें हेंच खरें पुरुषाच्या तपाचें, श्रवणाचें, यज्ञादिकांचें अध्ययनाचें आणि ज्ञानदानाचें मुख्य फल होय, असें विद्वान् पुरुष म्हणतात ॥ २२ ॥

अहो व्यास महर्षि हो ! पूर्वीच्या कल्पांत गेल्या जन्मामध्यें मी वेदविषयक विवाद करणाऱ्या योग्यांच्या कोण्या एका दासीचा मुलगा होतों व लहान असतांनाच पावसाळ्यांत एके ठिकाणीं राहण्याची इच्छा करणाऱ्या त्या योग्यांनीं मला स्वतःची सेवा करण्याबद्दल आज्ञा दिली ॥ २३ ॥

लहान मुलांच्या अंगांत स्वाभाविकतः असणारा चंचलपणा माझ्या अंगीं मुळींच नव्हता व मी इन्द्रियें स्वाधीन ठेवणारा, खेळण्याचा नाद नसणारा व योग्यांच्या आज्ञे-

प्रमाणें वागणारा, थोडें भाषण करणारा आणि उत्तम रीतीनें सेवा करणारा असा असल्या-मुळें समदृष्टीच्या योग्यांनीं माझ्यावर मोठा अनुग्रह केला ॥ २४ ॥

त्या योगनिष्ठ ब्राह्मणांनीं उष्ट्या पात्रांतील अन्न खाण्याबद्दल मला आज्ञा दिल्यामुळें तें उष्टें अन्न एकदांच खाऊन त्यायोगें मी पापरहित म्हणजे शुद्धबुद्धीचा झालों. याप्रमाणें वागणारा व शुद्धान्तःकरण बनलेला असा जो मी त्या मला भागवतधर्माबद्दल अधिकच आवड उत्पन्न झाली ॥ २५ ॥

अहो व्यास हो ! तेथें दररोज भगवंताच्या सुंदर कथा गाणाऱ्या योग्यांच्या कृपेनें मलाहि त्या ऐकायला मिळत असत; व अशा रीतीनें भगवंताच्या कथा श्रद्धेनें मी ऐकत असतां माझी परमेश्वराविषयींची आवड क्षणोक्षणीं वाढत चालली ॥ २६ ॥

अहो महर्षे वेदव्यास हो ! त्या भगवंताचे ठिकाणीं आवड उत्पन्न झालेला असा जो मी, त्या माझी बुद्धि तेथें स्थिर होऊन राहिली. ज्या स्थिर झालेल्या बुद्धीनें हें सर्व स्थावरजंगम असें स्थूल व सूक्ष्मरूपी जगत् परमेश्वरानें आपल्या मायेच्या योगें परब्रह्मस्वरूपी जो मी त्या माझ्या ठिकाणीं कल्पित केलेलें आहे, तें खरें नव्हे असें मी ठरविलें ॥ २७ ॥

याप्रमाणें दररोज क्षणोक्षणीं मोठ्या मननशील योग्यांनीं प्रेमानें गायिलेले परमे-श्वराचे निर्मळ गुणानुवाद मी श्रवण करीत असतां वर्षाऋतु व शरद्‌ऋतु असे दोन ऋतु म्हणजे पावसाळ्याचे चार महिने अर्थात् चातुर्मास्याचा काळ निघून गेला आणि रजोगुण व तमोगुण ह्या दोनहि गुणांचा फडशा पाडणारी भक्ति माझ्या ठिकाणीं उत्पन्न झाली ॥ २८ ॥

याप्रमाणें परमेश्वराच्या ठिकाणीं प्रेम करणाऱ्या आणि नम्र, निष्पाप, श्रद्धायुक्त, इन्द्रियनिग्रही व सेवा करण्याची आवड असणाऱ्या अशा बाल्यावस्थेंत असणारा जो मी, त्या माझी ॥ २९ ॥

भक्ति पाहून, दीनांवर दया करणाऱ्या आणि हें स्थान सोडून दुसरीकडे जाण्यास निघालेल्या योग्यांनीं दयाळू होऊन प्रत्यक्ष भगवंतानें सांगितलेलें असें जें अत्यंत गूढ व श्रेष्ठ ज्ञान तें मला सांगितलें आहे ॥ ३० ॥

त्या ज्ञानामुळें मी सर्वशक्तिमान् व षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा सर्वव्यापी परमेश्वराच्या मायेच्या प्रभावाला जाणलें. ज्या भगवत्स्वरूपाच्या ज्ञानामुळें भगवद्भक्त भगवंताच्या पदाला म्हणजे मोक्षाला प्राप्त होतात ॥ ३१ ॥

अहो ब्रह्मज्ञ वेदव्यास हो ! तीनहि तापांचा म्हणजे आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक अशा तापांचा नाश करणारें असें साधन तुला सूचित करून सांगितलें आहे. तें कोणतें तर षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा सर्वशक्तिमान् ब्रह्माचे ठिकाणीं अर्पण केलेलें जें कर्म तेंच सर्व तापांचा नाश करण्यास समर्थ आहे ॥ ३२ ॥

ह्याला एक व्यावहारिक उदाहरण देतों. ज्या पदार्थाच्या योगें प्राणिमात्रांस रोग उत्पन्न होतो तोच पदार्थ चांगल्या रीतीनें चिकित्सापूर्वक सेवन केला असतां त्या रोगाचा नायनाट करतो. अर्थात् त्याच पदार्थानें तो रोगी मनुष्य निरोगी बनतो ।। ३ ३ ।।

सर्व प्रकारचीं कर्में जरी मनुष्यांना संसार उत्पन्न करण्यास कारणीभूत असतात, तरी तींच कर्में परमेश्वराच्या ठिकाणीं अर्पण केलीं असतां आत्म्याच्या जन्ममरणरूपी संसारबंधनांचा नाश करण्यास समर्थ होतात ।। ३४ ।।

परमेश्वराला संतोष देणारें असें जें येथें कर्म केलें जातें व जें भक्ति व योग ह्यांनीं युक्त असें असतें, तेंच ज्ञान होय; व हें ज्ञान खरोखर कर्माधीनच असतें ।। ३५ ।।

येथें परमेश्वराच्या इच्छेनें वारंवार कर्में करणारे सत्पुरुष परमेश्वराचे गुण गातात व ईश्वरनामांचें नेहमीं स्मरण करतात ।। ३५ ।।

षड्गुणैश्वर्यसंपन्न, सर्वव्यापी असा जो तूं वासुदेव[1] त्या तुला आमचा नमस्कार असो. तसेंच प्रद्युम्न, अनिरुद्ध व संकर्षण अशीं स्वरूपें धारण करणाऱ्या तुला आम्ही नमस्कार करतों व तुझें ध्यानहि करतों ।। ३७ ।।

याप्रमाणें वर सांगितलेल्या वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध अशा चार मूर्तींच्या नांवांनीं मंत्र हीच मूर्ती असणाऱ्या व निर्गुण, निराकार अशा यज्ञस्वरूपी पूज्य परमेश्वराला जो पूजितो, त्याच पुरुषाला श्रेष्ठ ज्ञान प्राप्त होतें ।। ३८ ।।

अहो ब्रह्मज्ञ व्यास हो ! ह्यानें माझ्या आज्ञेप्रमाणें वर्तन केलें आहे असें जाणून भगवंतानें मला ईश्वरविषयक हें ज्ञान व भगवंताबद्दलची भक्ति देऊन कृतार्थ केलें ।। ३९ ।।

अहो बहुश्रुत वेदव्यास हो ! जें जाणलें असतां कोणतेंहि जाणण्याचें शिल्लक राहत नाहीं म्हणजे सर्व जाणल्यासारखें होतें, असें परमेश्वराचें प्रसिद्ध यश तूं वर्णन कर कीं, ज्यायोगें वारंवार दुःखानें पीडिलेल्या प्राणिमात्रांचे क्लेश नाश पावतील व ते सुखी होतील. ह्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि प्रकारानें त्या प्राण्यांचीं दुःखें नाहींशीं होणार नाहींत ।। ४० ।।

---

१. भगवंताच्या चार मूर्तिः वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध अशा कल्पिल्या आहेत. ' नमो भगवते ' हा श्लोक म्हणून भगवंताची उपासना करावी. ह्यांत चारहि मूर्तींना नमस्कार करून त्यांचें ध्यान केलें आहे. ह्या चार मूर्तींबद्दल श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधांत साद्यंत विवरण केलें आहे.

## पांचवा अध्याय समाप्त

---

# अध्याय ६ वा

हे ऋषि हो ! सत्यवतीचे पुत्र जे भगवान् व्यास त्यांनीं, नारदांनीं सांगितलेलें स्वतःचें जन्म व जन्मापासूनचें चरित्र ऐकून पुन्हा नारदास विचारलें ॥ १ ॥

व्यास म्हणाले, हे नारदा ! आपल्याला ज्ञानोपदेश करणारे ते महर्षि दूरदेशीं निघून गेल्यानंतर त्या आपल्या बालवयांत आपण कसे काय वागलां ? व पुढें काय केलें ? ॥ २ ॥

हे ब्रह्मपुत्रा नारदा ! तें तुमचें पुढील आयुष्य आपण कसें काय घालविलें ? व मरणसमयीं हा देह तरी कसा काय टाकलात ? ॥ ३ ॥

हे नारदा ! सर्वांचा नाश करणारा हा काल पूर्वजन्माची आपली ही स्मृति म्हणजे आठवण, कां नाहींशी करता झाला नाहीं ? ॥ ४ ॥

नारद म्हणाले, व्यासा ! मला ज्ञानाचा मार्ग दाखवून देणारे ऋषि दूरदेशीं निघून गेल्यावर बालवयांत राहणारा मी, ह्याप्रमाणें म्हणजे पुढें सांगितल्याप्रमाणें वागलों ॥ ५ ॥

माझ्या आईला मी एकुलता एकच मुलगा होतों. आई तर केवळ अज्ञानी, बोलूनचालून बायको माणूस; त्यांतून दासी म्हणजे दुसऱ्याची ताबेदार; मला दुसऱ्या कोणाचाच आधार नाहीं, असें समजून ती आपल्या मुलावर म्हणजे माझ्यावर जीव कीं प्राण करीत असे ॥ ६ ॥

माझा योगक्षेम[१] नीट चालावा; मला कोणत्याहि गोष्टीची कमतरता असूं नये, अशी तिची इच्छा असे; पण त्या इच्छेचा काय उपयोग ? खेळांतील

---

१ योगक्षेम हा शब्द आपण व्यवहारांत नेहमीं उपयोगांत आणतों व तोच शब्द नारदांनीं व्यासाला आत्मचरित्र सांगतांना उपयोगांत आणला आहे. "**अनार्जितस्यार्जनं योगः । अर्जितस्य रक्षणं क्षेमः**" हा योगक्षेम शब्दाचा संस्कृतांत अर्थ सांगितला आहे. जी वस्तु मिळाली नसेल ती मिळविणें याचें नांव योग व मिळालेल्या वस्तूचें रक्षण व योग्य उपयोग करणें याचें नांव क्षेम. स्त्री व पुरुष ह्या संसाररथाच्या दोन चाकांकडे दोन कामें वांटून दिलीं आहेत. पुरुषानें नोकरीचाकरी, उद्योगधंदा करून द्रव्य व वस्तु मिळविणें; अर्थात् योगाचें कार्य करणें, व स्त्रियांनीं आणलेल्या वस्तूचें संरक्षण व विनियोग करणें, अर्थात् क्षेम करणें हीं दोघांनीं म्हणजे स्त्रीपुरुषांनीं योगक्षेमाचीं कार्यें वांटून घेतलीं आहेत; व अशीं वांटून घेतलेलीं आपआपलीं कार्यें करून उभयतांनीं संसाररथ सुरळीत चालू करावयाचा असतो.

लांकडाच्या कळसूत्री बाहुलीची आणि तिची स्थिति सारखीच झाली होती. त्या बाहुलीला ज्याप्रमाणें स्वतः कांहींच करतां येत नाहीं, त्याप्रमाणेंच माझ्या आईची अवस्था झाली होती. कारण सर्व जग परमेश्वराच्या स्वाधीन आहे ।। ७ ।।

दिशा, देश व काल हीं माहीत नाहीं असा पांच वर्षांचा मी मुलगा असतांना माझ्या हातून कांहींच होण्यासारखें नव्हतें; म्हणून कसा तरी त्या ब्राह्मणाच्या घरांतच राहून काळ कंठीत होतों ।। ८ ।।

एके दिवशीं रात्रीं ती माझी अनाथ माता गायीची धार काढण्याकरितां घराबाहेर गेली असतां चुकून तिचा पाय एका सर्पावर पडला आणि त्यानें तिला काळाच्या आज्ञे-प्रमाणें दंश केला ।। ९ ।।

तेव्हां मी मनांत विचार केला कीं, ईश्वर जें जें करतो तें तें भक्तांच्या बऱ्याकरितांच करतो व माझी माता निवर्तली ही ईश्वराची आपल्यावर मोठी कृपाच झाली; असें समजून मी त्या ब्राह्मणाच्या घरांतून निघालों आणि उत्तर दिशेचा मार्ग धरला ।। १० ।।

जातां जातां वाटेमध्यें मला अनेक मोठमोठे देश आढळले. कांहीं शहरें, कित्येक खेडीं, गुरांचीं खिल्लारें, खेडींपाडीं वगैरे दिसल्यावर तशींच अनेक प्रकारचीं अरण्यें व बागबगीचे पाहत पाहत मी पुढें गेलों ।। ११ ।।

पुढें कित्येक पर्वत लागले. त्यांच्यावर धातूंच्या खाणी असल्यामुळें ते मोठे चित्रविचित्र दिसत. मोठमोठीं हत्तींचीं जंगलें लागलीं. तेथें हत्तींनीं मोठमोठ्या वृक्षांच्या ढाप्याच्या ढाप्या मोडून टाकलेल्या होत्या. तसेंच स्वच्छ पाण्याचीं मोठमोठीं सरोवरें व त्यांतील सुंदर सुंदर कमलिनीही पाहिल्या. त्यांतील कमलें तर इतकीं मोहक होतीं कीं, देवही त्यांचा उपभोग घेत असत ।। १२ ।।

मी पुढें चित्रविचित्र पक्ष्यांचे मंजुळ मंजुळ शब्द ऐकले. तसेंच तेथें इकडून तिकडे आणि तिकडूनइकडे भुंगे गुंजारव करीत उडत असत, त्याप्रमाणें देवनळ, कळक, दर्भांचे खुंटारे, दर्भ आणि आपोआप वायूनें वाजणाऱ्या कळकींचीं बेटें ह्यांची बनेंच्या बनें माजून राहिलीं असल्यामुळें त्यांच्या गुहाच बनल्या होत्या ।। १३ ।।

मी पाहिलेलें अरण्य तर अतिशय भयंकर होतें. सर्प, अजगर, घुबडें, वाघ आणि भालू अशा साऱ्या हिंस्र आणि भयानक पशुपक्ष्यांचें तें जणु माहेरघरच. असें तेंही अरण्य मी एकटाच ओलांडून गेलों ।। १४ ।।

अशा त्या घोर अरण्यांतून चालतां चालतां माझा जीव अतिशय व्याकुळ झाला व हातपाय थकून व तहानेनें घशाला कोरड पडून भुकेनें प्राण कासावीस होत चालले. त्या वेळीं मार्गामध्यें लागणाऱ्या नदीच्या खोल पाण्याच्या डोहांत मीं स्नान केलें आणि आचमन घेऊन व थंडगार पाणी पिऊन मी पुन्हा ताजातवाना झालों ।। १५ ।।

अशा त्या निर्जन अरण्यांतून जातां जातां पुढें एक पिंपळाचा वृक्ष लागला. त्याची घनदाट छाया पाहून मी त्याच्या सावलीखालीं बसलों आणि प्रत्येक प्राणिमात्राच्या हृदयांत राहणारा जो आत्मस्वरूपी परमेश्वर त्याचें ध्यान करण्यास प्रारंभ केला ॥ १६ ॥

भक्तियुक्त अंतःकरणानें भगवंताच्या चरणकमलाचें चिंतन करणाऱ्या व उत्कंठेनें नेत्रांतून अश्रु वाहताहेत अशा माझ्या हृदयांत तो परमात्मा हळूहळू प्रगट झाला ॥ १७ ॥

व्यासा ! तें परमेश्वराचें स्वरूप हृदयांत प्रगट होतांच माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले. चित्तवृत्ति स्तब्ध झाली. त्या आनंदाच्या पुरामध्यें मी इतका बुडून गेलों कीं, तो पुरुष व आपण दोन आहों, हा भावच नाहींसा झाला. तो परमेश्वर व आपण एकरूपच आहों, असें मला वाटूं लागलें ॥ १८ ॥

तें स्वरूप मला दिसतें तोंच गुप्त झालें. तें मनाला आह्लाद देणारें व दुःखाचा नाश करणारें परमेश्वराचें स्वरूप मनांतून एकदम गेल्याबरोबर मी दुःखानें भांबावल्यासारखा झालों आणि एकदम दचकून जाग्यावरून उठलों ॥ १९ ॥

मला तें स्वरूप पुन्हां पुन्हां पाहावेंसें वाटे, म्हणून मी तें दृष्टीस पडण्यासाठीं मनाला स्थिर करून हृदयामध्यें पुन्हां ध्यान करूं लागलों; पण पुन्हां दर्शन होईना. त्यामुळें मनाला अगदीं तळमळ लागून राहिली. मी परमेश्वरस्वरूपाच्या दर्शनाविषयीं अतृप्त झाल्यामुळें अतिशय उतावळा झालों ॥ २० ॥

अशा त्या निर्मनुष्य स्थळीं पुन्हां दर्शनासाठीं माझी खटपट चालली असतां, माझ्या वाणीला अगोचर असा जो परमात्मा त्यानें माझें दुःख नाहींसें होण्याकरितां गंभीर परंतु मधुर अशा वाणीनें [ अर्थात् आकाशवाणीनें ] सांगितलें कीं, ॥ २१ ॥

माझें दर्शन तुला या जन्मांत होण्यासारखी तुझी पात्रता नाहीं. कामक्रोधादि सारे मळ ज्याचे जळून खाक झाले नसतील, अशा अर्ध्याकच्च्या योग्याला माझें दर्शन दुर्लभ आहे ॥ २२ ॥

हे निष्पाप नारदा ! तुला एकवार जें मी स्वरूप दाखविलें, तेणेंकरून तुझ्या मनाला त्याच्याविषयीं आवड उत्पन्न झालीच आहे आणि ज्या पुरुषाला माझ्या दर्शनाची एकदां गोडी लागली, तो पुरुष ह्या ऐहिक विषयांपासून हळूहळू पराङ्मुखच व्हावयाचा ॥ २३ ॥

थोड्याच दिवसांच्या सत्संगतीनें तुझी बुद्धि माझ्या ठिकाणीं स्थिर झाली आहे. आतां तूं ह्या निंद्य शरीराचा त्याग करशील आणि मग माझा सेवक होशील ॥ २४ ॥

ही जी तुझी बुद्धि एक वेळ माझ्या ठिकाणीं स्थिर झाली आहे, ती कदापि हलावयाची नाहीं. सृष्टीची उत्पत्ति होवो कीं तिचा संहार होवो, तुझी स्मृति कायमची राहील. ती माझ्या कृपेनें कधींच नष्ट होणार नाहीं ॥ २५ ॥

अगम्य अशा त्या महद्भूतरूपी परमेश्वरानें आकाशवाणीनें इतकें मला सांगून ती वाणी बंद केली. त्यानें आपल्यावर एवढी मोठी कृपा केली हें मनांत येऊन व तो

परमेश्वर मोठ्याहून[1] मोठा आहे हें मनांत आणून, मी आपलें मस्तक नम्र करून त्यास वंदन केलें ॥ २६ ॥

ह्या ईश्वराच्या नादानें मी जर निर्लज्ज व केवळ वेडापिसाच बनलों आणि त्या अनंतस्वरूप परमेश्वराच्या गूढ नामांचा घोष करीत व त्यानें जे आपल्यावर उपकार केले त्याचें वारंवार स्मरण करीत मनांत संतुष्ट होऊन निरिच्छ मनानें, गर्वरहित व निर्मत्सर अंतःकरणानें पृथ्वीवर पर्यटण करून मृत्यु केव्हां येतो त्याची मार्गप्रतीक्षा करीत राहिलों होतों ॥ २७ ॥

हे व्यासा ! अशा रीतीनें मी सर्वसंगपरित्याग करून शुद्ध अंतःकरणानें श्रीकृष्ण-चरणीं ध्यान धरून कालक्रमणा करीत असतां एकाएकीं मेघपंक्तींतून वीज चमकून विद्युत्पात व्हावा, त्याप्रमाणें कालानेंही आपला तडाका मजवर गाजविला ! ॥ २८ ॥

पूर्वी सांगितल्याप्रमाणें परमेश्वर, शुद्ध व भगवत्स्वरूप स्थिति प्राप्त होण्याकरितां माझ्या देहाला नेत असतां, मध्येंच माझ्या पूर्वसंचिताची समाप्ती झाली आणि हा माझा पंचभूतात्मक देह पतन पावला ॥ २९ ॥

नंतर प्रलयकाळीं, ह्या सर्व त्रैलोक्याचा संहार करून त्या समुद्रोदकांत निजण्याची इच्छा करणाऱ्या परमेश्वराच्या श्वासोच्छ्वासाबरोबर मी त्याच्या उदरांत शिरलों ॥ ३० ॥

अशा स्थितींत एक हजार महायुगांचा काल लोटल्यानंतर परमेश्वर जागा होऊन ही सृष्टि पुन्हा उत्पन्न करण्याची इच्छा करूं लागला, तेव्हां त्याच्या इंद्रियांपासून मी व मरीचादि ऋषि उत्पन्न झाले ॥ ३१ ॥

आतां महाविष्णूच्या कृपाप्रसादानें मला कोठेंही जाण्यास प्रतिबंध नाहीं. म्हणून मी अखंड ब्रह्मचर्यव्रत पाळून त्रैलोक्याच्या आंतून व बाहेरूनही फिरत असतों ॥ ३२ ॥

परमेश्वरानें मलाही एक नादब्रह्मानें शोभणारी वीणा दिली आहे. ती मी वाजवितों आणि परमेश्वराचे गुणानुवाद गायन करीत फिरत असतों ॥ ३३ ॥

आपल्या यशाचें हा वर्णन करतो आहे, हें अंतःकरणांत जाणून ज्याच्या चरणां-मध्यें सर्व तीर्थें वास्तव्य करतात व ज्याची कीर्ति ब्रह्मदेवासारख्यास प्रिय आहे, तो परमेश्वर बोलावल्याप्रमाणेंच येऊन मला तत्काल दर्शन देत असे ॥ ३४ ॥

---

१. परमेश्वर हा लहानाहून लहान व मोठ्याहून मोठा आहे असें "**अणोरणीयान्महतो महीयानात्मस्य जन्तोर्निहितो गुहायां**" ह्या उपनिषद्वाक्यावरून सिद्ध होत आहे व त्याच प्रमाणभूत वेदान्तवाक्याला धरून येथें '**महतां महीयसे**' असें पद घातलें आहे. "**सहस्र ब्रह्माण्डें एकारोमीं एके धेंडे**"असें आधुनिक तुकारामादि साधूंनीं परमेश्वराच्या मोठेपणाचें वर्णन करितांना सांगितलें आहे. म्हणजे परमेश्वराच्या प्रत्येक रोमारोमाला जेथें हजारों ब्रह्मांडगोलक वास्तव्य करतात त्याच्या मोठेपणाबद्दल आणखी किती वर्णन करावें ? श्रीकृष्णचरित्रांत श्रीकृष्णानें मृत्तिकाभक्षणाचा मातेनें आरोप केल्या वेळीं यशोदेला स्वमुखांत आऽऽ पसरून शेंकडों ब्रह्माण्डें दाखविलीं हेंच ईश्वराच्या मोठेपणाचें द्योतक होय.

कारण, विषयोपभोगाच्या इच्छेनें वारंवार जे लोक मनामध्यें तळमळत असतात, अशा सांसारिक लोकांना भगवंताच्या चरित्राचें वर्णन ही एक ज्ञानी लोकांनीं संसार-समुद्रांतून पार पडून जाण्याकरितां नौकाच पाहून ठेविलेली आहे ॥ ३५ ॥

काम, क्रोध, लोभ इत्यादि विकारांनीं निरंतर त्रस्त झालेलें अंतःकरण जसें परमेश्वराच्या सेवेनें शांत होईल, तसें [1]यमनियमादि योगांच्या प्रत्यक्ष मार्गांनेंही व्हावयाचें नाहीं ॥ ३६ ॥ ॥

हे निष्पाप व्यासा ! तूं जें मला विचारलेंस तें माझें गुह्य, जन्म व जीवनचरित्र तुझ्या मनाला संतोष व्हावा म्हणून हें सारें सांगितलें आहे ॥ ३७ ॥

सूत म्हणाले, इच्छेस येईल तिकडे गमन करणारे भगवान् नारदमुनि ह्याप्रमाणें व्यासास उपदेश करून व त्यांचा निरोप घेऊन आपली वीणा वाजवीत निघून गेले॥३८॥

अहो ! हे नारदमुनि खरोखर धन्य होत ! कारण ते प्रसन्न अंतःकरणानें शार्ङ्ग-धनुष्य धारण करणाऱ्या भगवान् श्रीकृष्णाचे गुणानुवाद गायन करून, वीणा वाजवीत वाजवीत ह्या दुःखी जनाला रमवितात ॥ ३९ ॥

---

१ यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा व समाधि हे आठ योगाचे प्रकार आहेत. ह्यांस अष्टांगयोग म्हणतात. " **योगश्चित्तवृत्तिनिरोधः** " म्हणजे अंतःकरणाच्या संकल्पविकल्पादि वृत्ति ताब्यांत ठेवणें म्हणजे इन्द्रियनिग्रह करून षड्रिपूंचा जय संपादन करणें होय; व ह्या गोष्टी योगानें साध्य होतात. गीतेंत " **योगः कर्मसु कौशलं** " व " **समत्वं योग उच्यते** " वगैरे वाक्यें आढळतात. ह्या सर्व वाक्यांचा बाह्यार्थ जरी थोडा भिन्न वाटला, तरी तत्त्वांतीं सर्व वाक्यांची एकवाक्यताच होऊन त्यानें योगाचें समर्थनच होईल व वरील अर्थ कायम राहील. योग ही मोक्षप्राप्तीच्या सात पायऱ्यांपैकी एक पायरी आहे, असें समजावें.

## सहावा अध्याय समाप्त

# अध्याय ७ वा

शौनक म्हणाले; हे सूता ! नारदमुनि निघून गेल्यावर त्या समर्थ व्यासांनीं भगवान् नारदमुनींचा उपदेश ऐकल्यानंतर काय केलें ? ॥ १ ॥

सूत म्हणाले, शौनकादि ऋषि हो ! ब्रह्मदेवाची नदी जी सरस्वती तिच्या पश्चिम-तीरावर ऋषींच्या यज्ञांना वाढविणारा असा शम्याप्रास या नांवाचा एक प्रसिद्ध आश्रम आहे ॥ २ ॥

जेथें सभोंवर बोरींचीं झाडें गजबजलीं आहेत, अशा त्या बदरिकाश्रमामध्यें राहणारे व्यास नेत्रांस पाणी लावून व आचमन करून स्वस्थ आपल्या आसनावर बसले आणि नारदांनीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें आपल्याच मनामध्यें परमेश्वराचें चिंतन करूं लागले ॥ ३ ॥

अनन्यभक्तीच्या योगानें अत्यंत पवित्र झालेल्या व उत्तम रीतीनें स्थिर झालेल्या आपल्या अंतःकरणांत त्यांनीं प्रथमतः परमेश्वराचें आणि नंतर त्याच्याच आश्रयानें राहणाऱ्या मायेचेंही दर्शन घेतलें ॥ ४ ॥

व्यासांना त्या वेळीं त्यांच्या अंतःकरणांत आणखी काय दिसलें तर जीव हा खरोखर सत्त्व, रज व तम ह्या त्रिगुणांहून अगदीं निराळा असतांही, तो मायेच्या मोहांत गुंतून आपण त्रिगुणात्मकच आहोंत असें मानतो आणि त्याचाच अभिमान बाळगतो व ह्यामुळें मोठा अनर्थ होतो, हेंही व्यास त्या समाधिस्थितींत दिसून आलें ॥ ५ ॥

श्रीकृष्णाच्या ठिकाणीं खरी जडलेली भक्तीच सर्व अनर्थ समूळ नष्ट करण्यास समर्थ आहे, असें पाहून अज्ञानी लोकांच्या हृदयांत भक्तियोगाची वाढ होण्याकरितां ही भागवत-संहिता श्रीमद्वेदव्यासांनीं निर्माण केली ॥ ६ ॥

जें भागवत श्रवण केलें असतां परमपूज्य अशा श्रीकृष्णपरमात्म्याच्या ठिकाणीं भक्ति जडते आणि मग शोक व मोह ह्यांच्यापासून उत्पन्न होणारी भीति मुळींच राहात नाहीं ॥ ७ ॥

त्या मुनिवर्य व्यासऋषींनीं हा भागवत नांवाचा ग्रंथ रचून व तो नीट पाहून अत्यंत वैराग्यसंपन्न अशा शुक नांवाच्या आपल्या पुत्रास शिकविला ॥ ८ ॥

शौनक म्हणाले; निरंतर मोक्षमार्गांतच निमग्न असणारे, सर्वत्र उदासीन व स्वस्वरूपांतच रममाण होणारे जे शुकाचार्यमुनि, त्यांनीं तरी भागवतासारख्या एवढ्या प्रचंड ग्रंथाचा अभ्यास केला कशाला ? त्यांचा त्यांत हेतु काय ? ॥ ९ ॥

---

१ बदरी म्हणजे बोरीचें झाड; बदरिकाश्रम म्हणजे बोरीच्या वनांतील स्थळ. व्यासांना 'बादरायण' असें जें नांव पडलें आहे तें ह्यावरूनच. बादरायण म्हणजे बोरीच्या वनांत राहणारे. बदरिकाफल म्हणजे बोर.

सूत म्हणाले; आत्मस्वरूपांतच जे रममाण होणारे मुनि असतात, त्यांचा आनंद स्वभावसिद्धच असतो. कारण, कामक्रोधादि विकारांच्या असलेल्या त्यांच्या ग्रंथी नेहमीं तुटलेल्याच असतात. तरी सुद्धां ते मुनि सर्व जग ज्याची इच्छा करतें अशा परमेश्वराची निष्कामभक्तिही करतातच. कारण, परमेश्वराचे गुण तसेच अद्‌भुत आहेत ॥ १० ॥

असे श्रीहरीचे गुण अद्‌भुत असल्यामुळें त्यांनीं बादरायणि[1] अशा शुकाचार्यांची बुद्धिही आपल्याकडे ओढून घेतली होती, आणि नेहमीं भगवद्भक्त त्यांना अत्यंत प्रिय वाटत असत; म्हणून त्या भगवान् व्यासपुत्र शुकाचार्यांनीं हें भागवत एवढें मोठें असतांही त्याचें अध्ययन केलें ॥ ११ ॥

आतां परीक्षित् हा चक्रवर्ती राजाच होता असेंच केवळ नव्हे, तर राजर्षिहि होता. त्याचा जन्म कसा झाला ? त्यानें काय काय केलें ? त्याचा शेवट कोणत्या प्रकारें झाला ? तसेंच धर्मादि पांच पांडवांचेंहि स्वर्गारोहण कसें झालें ? त्याचप्रमाणें ज्या ज्या कथांत भगवान् श्रीकृष्णाचीं चरित्रें वर्णिलीं आहेत अशाहि कथा सांगतों ॥ १२ ॥

कौरव व सृंजय[2] म्हणजे पांडव यांचें घनघोर युद्ध चाललें असतां, त्या वेळीं उभयपक्षांतील मोटमोठे योद्धे धारातीर्थीं पतन पावून स्वर्गाला गेले आणि दुर्योधन भीमसेनाच्या गदाघातानें मांड्या मोडून तळमळत पडला ॥ १३ ॥

द्रोणाचार्यांचा पुत्र अश्वत्थामा; त्यानें आपल्या अन्नदात्याचें म्हणजे दुर्योधनाचें हित करून त्याची मर्जी सुप्रसन्न करून घ्यावी म्हणून द्रौपदीचे पुत्र निजले असतां त्यांचीं मस्तकें कापून आणलीं ! पण खरोखर त्यामुळें दुर्योधन प्रसन्न तर झाला नाहींच; पण उलट लहान अर्भकांस निजल्या ठिकाणीं मारणें हें कृत्य त्यासहि आवडलें नाहीं ! आणि त्या नीच कर्माची जनांनीं छीःथूच केली ! ॥ १४ ॥

तेव्हां त्या मुलांची आई जी द्रौपदी, ती आपल्या लहान लहान मुलांचा म्हणजे लेकरांचा असा क्रूरपणानें वध केल्याचें ऐकून तिच्या तळपायाची आग मस्तकास पोंचली. ती क्रोधानें संतप्त झाली. तिचे डोळे पाण्यानें भरून आले व डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले व तिनें रडून रडून आकांत केला. तेव्हां अर्जुन तिचें सांत्वन करतांना म्हणाला ॥ १५ ॥

---

१ '**बदरीणां समूहो बादरं, बादरं अयनं यस्य सः बादरायणः, तस्य अपत्यं बादरायणिः**' व्यासांना बादरायण असें नांव होतें. कारण त्यांचें अयन म्हणजे आश्रम बादरांत म्हणजे बोरींच्या वनांत होतें व त्या बादरायण अशा व्यासांचा मुलगा जो शुकाचार्य त्यास बादरायणि म्हणतात.

२ सृञ्जय व पांडव हे दोन भिन्न आहेत. तरी सुद्धा सृञ्जयवंशांत उत्पन्न झालेला धृष्टद्युम्न पांडवांचा सेनापति होता व पांडवसेना त्याच्या ताब्यांत होती; म्हणून पांडव शब्दाच्या ऐवजीं सृञ्जय शब्द उपयोगांत आणिला.

हे कल्याणि ! मी त्या अत्याचार करणाऱ्या आततायी[1] अशा चांडाळ ब्राह्मणाचें म्हणजे अश्वत्थाम्याचें मस्तक आपल्या गांडीव धनुष्यापासून सुटलेल्या बाणांनीं छेदून आणीन आणि त्यावर तुला बसवून तुझ्या पुत्रांच्या मरणाचें तुला स्नान घालीन आणि मग तुझे दुःखाश्रू पुसून टाकीन ! ॥ १६ ॥

प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवान् ज्याचा मित्र व सारथी, त्याची योग्यता काय वर्णन करावी ? असा तो अर्जुन आपल्या प्रिय पत्नीपुढें अशा मधुर व आवेशयुक्त भाषणानें प्रतिज्ञा करून व तिचें समाधान करून आणि अंगांत कवच घालून तो महाधनुर्धर, ज्याच्या रथाच्या ध्वजावर मारुति बसलेला आहे अशा त्या आपल्या रथांत बसून त्या गुरुपुत्रावर म्हणजे अश्वत्थाम्यावर चालून गेला ॥ १७ ॥

ज्यानें लहान बालांना ठार मारलें होतें, अशा अश्वत्थाम्याच्या मागोमाग अर्जुन रथांत बसून धावत असतां अश्वत्थामा घाबरला व त्याचे पायच लटपटूं लागले. तो आतां आपले प्राण कसे वांचवावेत ह्या विवंचनेंत पडला आणि नेववेल तितक्या वेगानें रथ हाकून तो घूम पळत सुटला व जसा शंकराला भिऊन सूर्य[2] पळाला त्याप्रमाणें तो वाट फुटेल तिकडे पळूं लागला ॥ १८ ॥

ब्राह्मणपुत्र अश्वत्थाम्याच्या रथाचे घोडे जेव्हां दमले, तेव्हां आतां आपला निभाव लागत नाहीं व आपल्या रक्षणाचा दुसरा आतां मार्ग उरलेला नाहीं, असें समजून आपल्या प्राणाचा बचाव होण्यास ब्रह्मास्त्रावांचून दुसरें कांहींच साधन नाहीं, असा त्यानें विचार केला ॥ १९ ॥

त्याचा तो विचार निश्चित झाल्यावर त्यानें नेत्रांना उदक लावलें व आचमन केलें आणि प्राणांवर संकट आलें आहे असें जाणून ब्रह्मास्त्र आवरून कसें घ्यावें हें माहीत नसतांही त्यानें तें सोडलें ! ॥ २० ॥

---

१ **अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः ।**
**क्षेत्रदारहरश्चैव षडेते ह्याततायिनः ॥ १ ॥**

‘ आग लावणारा, विष घालणारा, हातांत शस्त्र घेऊन मारावयास येणारा, द्रव्याचा अपहार करणारा, जमीन हरण करणारा व स्त्रीचें हरण करणारा ’ हे सहा आततायी असें समजावें. ह्यांचा वध केल्यास त्यांत दोष नाहीं.

२ विद्युन्माली राक्षसानें शंकराला प्रसन्न करून घेऊन त्याच्याकडून एक सोन्याचें विमान घेतलें. तो त्या विमानांत बसून सूर्याच्या मागोमाग फिरत असे. त्यामुळें असें होऊं लागलें कीं, जेथें सूर्य नसेल तेथें विद्युन्मालीचें विमान असे. त्या विमानाच्या तेजामुळें रात्रीचाही जिकडेतिकडे प्रकाश पडे. ह्यामुळें पृथ्वीवर कोठें रात्रच नाहीं असें झालें. ही गोष्ट सूर्याच्या लक्षांत आली तेव्हां तो रागावला आणि त्यानें आपल्या तेजानें विद्युन्मालीचें सुवर्णाचें विमान होतें तें वितळून टाकलें. ही गोष्ट शंकरास कळतांच आपल्या भक्ताचें विमान सूर्यानें नाश करून टाकलें हें ऐकून शंकरांनीं क्रोधानें आपले डोळे उघडले,

अश्वत्थाम्यानें ब्रह्मास्त्र सोडतांच दशदिशांना प्रखर तेज दिसूं लागलें. तें पाहून अर्जुनही गडबडला आणि आतां केवळ प्राणांतसमय आला आहे असें जाणून तो श्रीकृष्णास म्हणाला ॥ २१ ॥

अर्जुन म्हणाला, हे कृष्णा ! सर्व भक्तांच्या भीति नाहींशा करणाऱ्या हे महाभाग्यवान् कृष्णा ! ! संसारतापानें दग्ध झालेल्या लोकांस मुक्ति देणारा तूं एकटाच आहेस ॥ २२ ॥

तूंच प्रत्यक्ष परमेश्वर असून तूं मायेहून फार भिन्न आहेस. उत्तम पुरुष परमात्मा तो तूंच; सर्वांचें आदि कारण तें तूंच; मायेला दूर सारून चित्स्वरूपानें कैवल्यस्वरूपी आत्मस्थितींत असणारा तूंच ॥ २३ ॥

तोच तूं स्वतःच्या पराक्रमानें, मायेनें ज्यांचीं अंतःकरणें गुंग झालीं आहेत अशा जीवांचें, धर्म, अर्थ, काम व मोक्ष इत्यादि चार पुरुषार्थांच्या योगें कल्याण करणारा आहेस ॥ २४ ॥

त्याचप्रमाणें तुझा हा अवतारही एवढ्याचकरितां आहे कीं, पृथ्वीला झालेला दुर्जनांचा भार कमी व्हावा आणि तुझे जे कोणी अनन्यभावानें भक्त झालेले आहेत, त्यांना बारंवार ध्यान करण्याला व चिंतन करण्याला तुझ्या सगुणस्वरूपाचा लाभ व्हावा म्हणून ॥ २५ ॥

हे प्रकाशमान देवा ! चहूंकडून पसरत येणारें हें अत्यंत भयंकर कसलें तेज आहे ? हें आहे तरी काय ? हें कोठून येत आहे ? तें कशाचें ? हें मला कांहींच समजत नाहीं ॥ २६ ॥

भगवान् म्हणाले, अर्जुना ! द्रोणाचार्यांचा पुत्र जो अश्वत्थामा, त्यानें आपल्या प्राणसंकटाच्या वेळीं सोडलेलें हें ब्रह्मास्त्र आहे असें जाण. हा अश्वत्थामा ब्रह्मास्त्राला परत कसें घ्यावें, हें जाणतच नाहीं, तें तुला माहीत आहे ॥ २७ ॥

अर्जुना ! ह्या अश्वत्थाम्यानें सोडलेल्या महाजाज्वल्य तेजाचा इतर कोणत्याहि अस्त्रानें नाश व्हावयाचा नाहीं. ब्रह्मास्त्र कसें सोडावें हें तुला माहीत आहेच, करितां तूं तसेंच देदीप्यमान ब्रह्मास्त्र सोडून त्यानें सोडलेल्या अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्राच्या तेजाचा संहार कर ! ॥ २८ ॥

सूत म्हणाले, मोठमोठ्या युद्धकुशल शत्रूंचा पराभव करणाऱ्या त्या अर्जुनानें भगवान् श्रीकृष्णाचें हें भाषण श्रवण करतांच उदक घेऊन तें नेत्रांस लावलें; आचमन केलें आणि श्रीकृष्णाला प्रदक्षिणा करून अश्वत्थाम्यानें सोडलेल्या ब्रह्मास्त्राच्या नाशार्थ स्वतः ब्रह्मास्त्र सोडलें ॥ २९ ॥

---

त्यामुळे त्या तृतीय अग्निनेत्राच्या तेजानें सूर्य घाबरून पळत सुटला. तरीसुद्धां तो शंकराच्या जाज्वल्य दृष्टीनें होरपळून लोळागोळा होऊन वाराणशींत पडला ! तोच ‘ लोलार्क ’ ह्या नांवानें आतांहि प्रसिद्ध आहे, अशी वामनपुराणांत कथा आहे.

अर्जुनानेंही ब्रह्मास्त्र सोडतांच त्या दोघांच्याही ब्रह्मास्त्रांपासून निघालेलें तेज एकमेकांत मिसळून सर्व ब्रह्मांडांत पसरलें. सारी पृथ्वी, स्वर्ग व आकाश त्या देदीप्यमान तेजानें व्यापून गेलें आणि जणूं काय प्रलयाग्नीच्या किंवा द्वादशादित्याच्या ज्वाळा पसराव्या त्याप्रमाणें जिकडेतिकडे आगच आग भडकून गेली ॥ ३० ॥

ह्या एकवटलेल्या दोन्ही तेजांनीं दग्ध होत असलेले सर्व प्राणिमात्र असें मानूं लागले कीं, खरोखर त्रैलोक्याला जाळून टाकणाऱ्या दोन्ही अस्त्रांच्या मोठ्या दुःसह तेजांनीं प्रलयकाल जवळ आला काय ? ॥ ३१ ॥

सारे लोक हवालदिल झाले; पुष्कळ लोक नाश पावले. हें पाहून अर्जुनानें श्रीकृष्णाच्या संमतीनें त्या दोन्हीही ब्रह्मास्त्रांचा उपसंहार केला ॥ ३२ ॥

इतकें झाल्यानंतर अर्जुन क्रोधानें डोळे लाल करून धावत धावत गेला आणि त्यानें त्या अश्वत्थाम्याला गांठलें. एखादा पशु ज्याप्रमाणें दोरीनें बांधतात, त्याप्रमाणें त्यानें त्यास दोरीनें घट्ट बांधून ठेवलें ॥ ३३ ॥

अर्जुन आपल्या शत्रूला दोरीनें बांधून आतां बलात्कारानें त्यास शिबिरास नेणार, असें पाहून कमलनयन भगवान् श्रीकृष्ण थोडेंसें रागावल्यासारखें करून त्यास म्हणाले ॥ ३४ ॥

अर्जुना ! ह्या तुझ्या शत्रूला म्हणजे अश्वत्थाम्याला सोडणें किंवा त्याला क्षमा करणें मुळींच योग्य नाहीं. ह्या ब्राह्मणाधमाचा वधच केला पाहिजे. ज्यानें रात्रीं निरपराधी बालकांचा वध केला आहे, त्याला क्षमा कशाची ? ॥ ३५ ॥

धर्मज्ञ लोक मद्य प्यालेल्या, बेसावध असलेल्या, वेड लागलेल्या, निद्रिस्त, बाल्यावस्थेंतल्या, स्त्री, मूर्ख, शरण आलेल्या, विरथ झालेल्या किंवा जो भेदरला असेल अशा शत्रूंना कधींही मारीत नाहींत ॥ ३६ ॥

जो निर्दय व दुष्ट दुसऱ्याच्या प्राणांनीं आपले प्राण पुष्ट करतो, त्याचा वध करणें ही गोष्ट त्याच्याच कल्याणाची असते. कारण, नाहीं तर तो अधोगतीला जाणारा असतो ॥ ३७ ॥

‘ हे मानवती द्रौपदी ! ज्यानें तुझ्या पुत्रांचा वध केला, त्याचें मस्तक छेदून आणीन ! ’ असें तूं द्रौपदीला माझ्या समक्ष दिलेलें वचन मीं ऐकलें आहे ॥ ३८ ॥

हे वीरा अर्जुना ! हा अश्वत्थामा सामान्य पातकी नव्हे; तर घातकी आहे ! हा ब्राह्मणाधम आहे; वंशच्छेदक आहे. ह्याकरितां ह्याचा वध करणेंच इष्ट दिसतें ! बरें; ह्यानें धन्याच्या मर्जीसारखी गोष्ट केली म्हणावें, तर तेंही नाहीं. त्याच्या धन्याला म्हणजे दुर्योधनालाही जी गोष्ट रुचली नाहीं, ती त्यानें केली ॥ ३९ ॥

सूत म्हणाले, अशा प्रकारें श्रीकृष्णांनीं धर्मसंबंधाचा विचार जो काय सांगावयाचा तो अर्जुनाला सांगितला; परंतु अर्जुन फार थोर मनाचा होता. त्याचे स्वतःचे पुत्र मारले होते, तरी सुद्धां गुरुपुत्र जो अश्वत्थामा त्यास मारण्याविषयीं त्याचें मन धजेना ॥ ४० ॥

नंतर श्रीकृष्ण हाच ज्याचा मित्र व सारथी अशा अर्जुनानें आपल्या शिबिरांत येऊन, तेथें आपले पुत्र मेल्याबद्दल शोक करीत बसलेली प्रियपत्नी जी द्रौपदी तिच्यापुढें अश्वत्थाम्याला आणून उभा केला ॥ ४१ ॥

परंतु द्रौपदी फार उदार अंतःकरणाची होती. तिनें पाहिलें तों यज्ञामध्यें बळी देण्यासाठीं ज्याप्रमाणें एखादा अजापुत्र दोरीला बांधून आणतात, त्याप्रमाणें त्या अश्वत्थाम्याला अर्जुनानें दोरीनें आवळून आणलें आहे आणि लहान मुलांचा घात केल्यामुळें त्या निंद्य कृत्याबद्दल लज्जायमान होऊन त्यानें मान खालीं घातली आहे अशा प्रकारें दीन व अपमानित झालेल्या अश्वत्थाम्याला पाहून सरळ स्वभावाच्या द्रौपदीला त्याची दया आली आणि तिनें हा आपल्या गुरूंचा म्हणजे द्रोणाचार्यांचा पुत्र आहे असें समजून त्याला दयाळू अन्तःकरणानें सप्रेम नमस्कार केला ॥ ४२ ॥

द्रौपदीच्यानें अश्वत्थाम्याला असें गुरासारखें बांधून आणलेलें पाहवेना व ती एकदम म्हणाली, ह्याला सोडा ! ह्याला सोडा ! ! कितीही झालें तरी हा ब्राह्मण आहे, एवढेंच नव्हे तर हा आपला गुरु आहे ! ! ॥ ४३ ॥

अहो ! अत्यंत गूढ रहस्यासुद्धां सारा धनुर्वेद म्हणजे अस्त्रें सोडावींत कशीं व आवरावींत कशीं हें सर्व तुम्ही त्यांच्या कृपेनें शिकलांत, हें विसरूं नका ! ॥ ४४ ॥

हा गुरुपुत्र नव्हे, तर महासमर्थ व भाग्यशाली द्रोणाचार्य पुत्ररूपानें ह्या जगांत राहिले आहेत. त्यांची अर्धांगी प्रियपत्नी कृपी ती सुद्धां अद्याप जिवंत आहे. कारण, ती वीरमाता असल्यामुळें तिनें त्यांच्याबरोबर सहगमन केलें नाहीं ! ॥ ४५ ॥

हे धर्मज्ञा ! भाग्यशीला ! अर्जुना ! आपण नित्य ज्याला वंदन करावें, नित्य ज्याची पूजा करावी असें जें हें गुरूचें कुल, त्यास आपण दुःख द्यावें हें मुळींच इष्ट नव्हे ! ॥ ४६ ॥

माझीं मुलें मृत झाल्यामुळें मी जशी दुःखानें होरपळून व डोळ्यांत पाणी आणून धाय धाय मोकलत आहें, तशी त्या अश्वत्थाम्याची माता महान् पतिव्रता जी गौतमी तिनें पुत्रनाशामुळें दुःखित होऊं नये, अशी माझी इच्छा आहे ! ॥ ४७ ॥

इंद्रियनिग्रह न करतां जे राजेलोक ब्राह्मणांच्या कुलांचा उपमर्द करतात, त्यांचें सारें कुल त्या ब्राह्मणकुलाच्या शापानें व शोकानें व्याप्त होऊन तत्काल जळून खाक होतें ! ॥ ४८ ॥

सूत म्हणाले, अहो ब्रह्मवृंद हो ! धर्मराज जवळच बसलेले होते. त्यांनीं तें द्रौपदीचें धर्मयुक्त, न्याय्य, सदय अंतःकरणाचें, सरळ व प्रौढपणाचें भाषण ऐकून त्यास आपलें अनुमोदन दिलें ॥ ४९ ॥

त्या ठिकाणीं दुसरीही बरीच मंडळी होती. नकुळ, सहदेव, सात्यकी, अर्जुन, भगवान् श्रीकृष्ण व इतर स्त्रियाही होत्याच. त्यांनींही त्याला अनुमोदन दिलें ॥ ५० ॥

हें सर्व ऐकून भीमसेन मात्र रागानें लाल होऊन म्हणाला, अश्वत्थाम्याचा वध करणें हेंच इष्ट आहे. अहो ! ह्यानें लहान लहान अर्भकांचे गळे कीं हो कापले ! ह्याची कांहीं तरी आठवण करा ! बरें, त्यापासून धन्याचें हित म्हणावें तर तेंही नाहीं. बरें ! त्याचें स्वतःचें म्हणावें तर तेंही नाहीं ॥ ५१ ॥

चतुर्भुज श्रीकृष्ण भीमसेनाचें व द्रौपदीचें पूर्वोक्त भाषण ऐकून घेऊन आपल्या मित्राच्या म्हणजे अर्जुनाच्या मुखाकडे पाहून व थोडेंसें हसल्यासारखें करून बोलूं लागले ॥ ५२ ॥

श्रीकृष्ण म्हणाले, अर्जुना ! ब्राह्मणाला मारूं नये असाही धर्म मींच सांगितला आहे. बरें, एखादा पुरुष महाविद्वान् आहे; पण तो जर आततायी असेल तर त्याच्या वधापासून ब्रह्महत्येचा दोष नाहीं, असेंही मींच सांगितलें आहे. तेव्हां आतां त्या दोन्हीही आज्ञा पाळल्या जातील असें तुला योग्य दिसेल तें कर म्हणजे, झालें ! ॥ ५३ ॥

अर्जुना ! तुझी प्रियपत्नी द्रौपदी, तिच्या सांत्वनाच्या वेळीं जी तूं प्रतिज्ञा केली आहेस तीहि खरी कर आणि भीमसेनाला, द्रौपदीला व मलाहि बरें वाटेल असें कर ! ॥ ५४ ॥

सूत म्हणाले, ऋषि हो ! ह्या श्रीकृष्णाच्या भाषणावरून अर्जुनानें त्याच्या मनांतील हेतु तात्काळ ओळखला आणि तरवारीनें त्या ब्राह्मणाच्या मस्तकांत जो एक मणी होता तो त्याच्या केसांसहवर्तमान काढून घेतला ॥ ५५ ॥

नंतर ज्या दोरीनें बांधलें होतें ती दोरी सोडून अश्वत्थाम्याला मुक्त केलें. बालहत्या घडली असल्यामुळें तो आधींच निस्तेज झाला होता. त्यांत आणखी मणीही काढून घेतला असल्यामुळें तो अगदींच काळाठिक्कर पडला. अशा परिस्थितींत त्यास शिबिरांतून हांकून दिलें ॥ ५६ ॥

क्षौर करणें–( पांच पाट काढणें ), द्रव्याचा दंड करणें, राज्यांतून हांकून देणें हाच ब्राह्मणधर्माचा वध होय. त्याला दुसऱ्या देहान्तशिक्षेची गरजच नाहीं ॥ ५७ ॥

सूत म्हणतात, अश्वत्थाम्याला शिबिरांतून घालवून दिल्यानंतर द्रौपदीसहवर्तमान सारे पांडव शोकानें फार विव्हळ झाले असतांहि त्यांनीं तें पुत्रविरहानें उत्पन्न झालेलें दुःख क्षणभर बाजूस ठेवून युद्धांत मेलेल्या आपल्या आप्तेष्टांचें दहनादि और्ध्वदेहिक कृत्य केलें ॥ ५८ ॥

**सातवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ८ वा

सूत म्हणाले, शौनकादि ऋषि हो ! ह्याप्रमाणें अश्वत्थाम्याला शिबिरांतून हांकलून लावल्यानंतर श्रीकृष्णासह ते युधिष्ठिरप्रमुख पांच पांडव द्रौपदीप्रमुख स्त्रियांना पुढें करून युद्धांत मेलेल्या आपल्या आप्तेष्ट भाऊबंदांना पाणी देण्याकरितां गंगेच्या कांठीं गेले ॥ १ ॥

त्या पांडवांनीं स्त्रियांसह यथाविधि सर्व भाऊबंदांना तर्पणद्वारां पाणी देऊन व त्यांच्याबद्दल पुष्कळ शोक करून श्रीभगवंताच्या चरणकमलापासून निघाल्यामुळें अत्यंत पवित्र अशा गंगेच्या पाण्यांत स्नान केलें ॥ २ ॥

भगवान् श्रीकृष्णानें तेथें बसलेल्या युधिष्ठिरादि पांचाहि पांडवांना, तसेंच धृतराष्ट्राला आणि पुत्रशोकानें व्याकुळ झालेल्या गांधारीला, कुंतीला व द्रौपदीला चार समाधानाच्या गोष्टी सांगून त्यांचें सांत्वन केलें ॥ ३ ॥

ऋषींसह बसलेल्या श्रीकृष्णानें, युद्धांत भाऊबंद मेल्याबद्दल अत्यंत शोकानें व्याकुळ झालेल्या युधिष्ठिर, धृतराष्ट्र, गांधारी, कुंती इत्यादिकांना 'कालाची गति अपरिहार्य आहे; प्रत्येक प्राणिमात्रास जन्म व मृत्यु हे कालाच्या योगें निश्चित ठरलेले आहेत; शोक करणें बरोबर नव्हे; तुम्ही आतां उगीच शोक करूं नका !' वगैरे अनेक प्रकारचा उपदेश करून त्यांच्या मनाचें समाधान केलें ॥ ४ ॥

कपटी दुर्योधनादिकांनीं खोट्या मार्गानें जाऊन द्रौपदीचे केंस धरून तिला सभेंत आणून तिचा छळ केला आणि पांडवांचें सर्व राज्य कपटानें हरण केलें. व त्यामुळें हे दुष्ट राजे अल्पायु झाले. तेव्हां अशा त्या दुष्ट कौरवादिकांना मारवून श्रीकृष्णानें पांडवांचें राज्य पांडवांना परत मिळवून दिलें ॥ ५ ॥

नंतर श्रीकृष्णानें उत्तम तऱ्हेची यज्ञसामग्री संपादन करून त्यायोगें युधिष्ठिराकडून तीन अश्वमेध यज्ञ करविले व त्यायोगें शंभर अश्वमेध यज्ञ करणाऱ्या इंद्राप्रमाणें दाही दिशांत त्या युधिष्ठिराचें पवित्र यश दुमदुमून राहिलें ॥ ६ ॥

नंतर ज्यांची सर्वांनीं पूजा केली होती अशा व्यासादि ऋषींनीं सत्कारपूर्वक पूजा केलेल्या श्रीकृष्णानें सात्यकि व उद्धव ह्यांच्यासह द्वारकेंत परत जाण्याबद्दल पांडवांची अनुज्ञा घेतली ॥ ७ ॥

ज्या वेळीं श्रीकृष्ण, सात्यकि व उद्धव ह्यांसह रथांत बसून द्वारकेंत जाण्यास निघाले तेव्हां भयानें व्याकुळ झालेली उत्तरा धांवत धांवत श्रीकृष्णाकडे गेली. त्या वेळीं श्रीकृष्णानें ती भ्यायली आहे असें पाहिलें ॥ ८ ॥

उत्तरा श्रीकृष्णाला म्हणते ! 'हे योगिश्रेष्ठा ! हे देदीप्यमान देवा ! ! हे सर्व जगाच्या रक्षका परमेश्वरा ! ! ! आपण माझें रक्षण करा, रक्षण करा ! सर्व प्रकारची भीति

नाहींशी करून भक्तांचें रक्षण करणारा असा तुझ्याशिवाय दुसरा कोणीहि मला आढळत नाहीं. कारण इतर ठिकाणीं परस्परांपासून परस्परांना मृत्यूची भीति असल्यामुळें तूंच सर्वांचा रक्षणकर्ता आहेस ! ॥ ९ ॥

हे सर्वव्यापी परमेश्वरा श्रीकृष्णा ! तापलेल्या लोखंडाप्रमाणें ज्याचा अग्रभाग आहे असा हा बाण माझ्या अंगावर धांवत धांवत येत आहे. करितां हे स्वामिन् ! ह्या बाणानें झालाच तर माझा नाश होवो, त्याची मला पर्वा नाहीं ! माझ्या गर्भाचा मात्र नाश न व्हावा एवढीच माझी इच्छा आहे ! ॥ १० ॥

सूत म्हणाले, शौनकादिक ऋषि हो ! भक्तांवर प्रेम करणाऱ्या भगवान् श्रीकृष्णानें उत्तरेचें दीन भाषण श्रवण करून " निष्पांडवी पृथ्वी करण्याकरितां अर्थात् पांडवांचा वंशाच्छेद करण्याकरितां उत्तरेला ठार मारण्याच्या इच्छेनें अश्वत्थाम्यानें सोडलेलें हें ब्रह्मास्त्र आहे " असें ज्ञानदृष्टीनें जाणलें ॥ ११ ॥

शौनकादि ऋषिश्रेष्ठ हो ! नंतर त्याच वेळीं पांडवांनीं पाहिलें कीं, आमच्याहि अंगावर पेटलेले पांच बाण आपला नाश करण्याकरितां येत आहेत. असें पाहतांच त्यांचा नाश करण्याकरितां पांचहि पांडवांनीं आपापल्या हातांत अस्त्रें उचलून घेतलीं ॥ १२ ॥

सर्वव्यापी अशा श्रीकृष्णानें आपल्यावरच केवळ अवलंबून राहिलेल्या पांडवांवर हा मोठा दुःखाचा प्रसंग प्राप्त झाला आहे व ह्या अश्वत्थाम्यानें सोडलेल्या पांच बाणांचा नाश पांडवांच्या सामान्य अस्त्रांनीं होणार नाहीं असा विचार करून आपलें सुदर्शन नांवाचें अस्त्र त्यांवर सोडून अश्वत्थाम्याच्या सर्व बाणांचा नाश केला व पांडवांचें व उत्तरेचें रक्षण केलें ॥ १३ ॥

योगश्रेष्ठ श्रीकृष्ण हा सर्व प्राण्यांच्या आंत आत्मस्वरूपानें वास्तव्य करणारा असल्यामुळें त्यानें विराट्राजाची कन्या जी उत्तरा तिच्या पोटांत मायेच्या योगानें प्रवेश करून पोटांतील गर्भाला वेढून टाकलें. त्यामुळें त्या गर्भाला अश्वत्थाम्याच्या अस्त्रापासून बिलकुल त्रास झाला नाहीं ॥ १४ ॥

शौनकऋषि हो ! अश्वत्थाम्यानें सोडलेलें ब्रह्मास्त्र कधींहि फुकट न जाणारें आणि कोणाकडूनहि नाश न पावणारें होतें; तरी विष्णुतेजाची गांठ पडतांच तें शांत झालें॥ १५॥

श्रीकृष्णानें हें जें आश्चर्यकारक कृत्य केलें ह्याबद्दल आश्चर्य मानण्याची जरुरी नाहीं. कारण अशीं कित्येक आश्चर्ये त्याच्यांत भरून राहिलीं आहेत. ज्याला जन्ममरणादि नाहींत असा तो परमेश्वर, सर्वप्रकाशक अशा मायेच्या साहाय्यानें संपूर्ण जगाची उत्पत्ति करतो व नाशहि पण करतो ॥ १६ ॥

द्रौपदीसह आपले पुत्र पांडव अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रापासून मुक्त झाले असें पाहून, सद्धर्मानें वागणाऱ्या कुंतीनें द्वारकेला जाण्यास निघालेल्या श्रीकृष्णाची स्तुति करून सांगितलें ॥ १७ ॥

कुंती श्रीकृष्णास म्हणालीः—हे श्रीकृष्णा ! तूं आत्मरूपानें प्रत्येक प्राणिमात्राच्या हृदयांत वास्तव्य करतोस. सर्वांचा आदि व मायेहून भिन्न आणि सर्वैश्वर्यसंपन्न असा तूं आहेस. तूं निराकार असल्यामुळें कोणालाहि न दिसणारा व सर्व प्राण्यांच्या आंत व बाहेर राहणारा आहेस. तुला मी नमस्कार करित्यें ॥ १८ ।)

अज्ञानी अशी मी मायारूपी पडद्यानें आच्छादिलेल्या व इंद्रियांना अगोचर अशा अविनाशी तुला नमस्कार करित्यें. ज्याप्रमाणें सोंग घेणाऱ्या नाटकी पुरुषाला अज्ञानी लोक ओळखूं शकत नाहींत, त्याप्रमाणें हे श्रीकृष्णा, तुझें खरें स्वरूप अज्ञानी लोकांना दिसत नाहीं ॥ १९ ॥

हे श्रीकृष्णा ! त्याचप्रमाणें वैष्णवधर्म स्वीकारलेल्या निर्मल अंतःकरणाच्या मुनींच्याहि दृष्टीस तूं पडत नाहींस. असें जर आहे तर मग आम्ही बोलूनचालून स्त्रियाच ! भक्तियोगाच्या आचरणाकरितां आम्हांसारख्या अज्ञ स्त्रियांना तुझ्यासारख्याचें स्वरूप कसें दृष्टीस पडणार ? ॥ २० ॥

हे श्रीकृष्णा ! तूं प्रकाशरूपानें सर्वत्र राहणारा असून वसुदेवाच्या कुळांत अवतीर्ण झाला आहेस. तूं देवकीला आनंद देणारा पुत्र असून नंद गवळ्याच्या घरीं तूं पुत्ररूपानें राहिला आहेस. तूं सर्वज्ञ असून वेदवाणी जाणणारा आहेस. सर्व भक्तांचीं अंतःकरणें आपल्याकडे ओढून घेणारा तूं आहेस. अशा तुला मी वारंवार नमस्कार करित्यें ॥ २१ ॥

हे श्रीकृष्णा ! ज्याच्या बेंबीपासून कमळ उत्पन्न झालें अशा तुला माझा नमस्कार असो. तसेंच ज्यानें गळ्यांत कमळपुष्पांची माळ घातली आहे अशा तुला नमस्कार असो. कमळाप्रमाणें डोळे असणाऱ्या तुला नमस्कार असो; त्याचप्रमाणें पाय कमलाप्रमाणें असणाऱ्या तुला नमस्कार असो ॥ २२ ॥

हे जितेन्द्रिय सर्वव्यापी श्रीकृष्णा ! ज्याप्रमाणें पूर्वीं दुष्ट कंसानें फार दिवसपर्यंत बंदीखान्यांत ठेवून त्रास दिलेल्या व शोक करीत बसलेल्या देवकीला तूं दुःखापासून मुक्त केलेंस, त्याचप्रमाणें पुत्रांसहवर्तमान अशी जी मी त्या माझीहि तुझ्याकडून वारंवार सर्व संकटांतून मुक्तता झाली ॥ २३ ॥

हे श्रीकृष्णा ! विषापासून, मोठ्या अग्नीपासून, राक्षसांपासून, दुष्ट दुर्योधनाच्या सभेंतून, वनवासांतील दुःखांपासून व प्रत्येक युद्धांत मोठमोठ्या पराक्रमी महारथी वीरांनीं सोडलेल्या शस्त्रास्त्रांपासून, तसेंच अश्वत्थाम्यानें नुकत्याच सोडलेल्या ब्रह्मास्त्रापासून आपण आमचें रक्षण केलें आहे ॥ २४ ॥

हे जगद्गुरो श्रीकृष्णा ! आम्हांला प्रत्येक ठिकाणीं आपत्तीच प्राप्त होवोत; आम्हांवर नेहमीं संकटेंच येवोत, कारण प्रत्येक संकटसमयीं तुझें दर्शन घडून आमची पुनर्जन्मादिकांची यातायात नष्ट होईल ! ॥ २५ ॥

हे श्रीकृष्णा ! उत्तम व श्रीमंत कुळांत जन्माला येऊन ज्ञान व संपत्ति यांच्या मदानें धुंद झालेले व ऐषआरामांत लोळणारे पुरुष तुझें नामग्रहण करण्याला पात्रच नाहींत; कारण तूं श्रीमंत लोकांना भेटणारा नसून दरिद्री लोकांनाच दिसणारा आहेस ॥ २६ ॥

हे श्रीकृष्णा ! निःसंगता हेंच तुझें ऐश्वर्य आहे. तूं निर्गुण असल्यामुळें सत्त्वादि त्रिगुणांचे जे लोभादि धर्म ते तुझे ठिकाणीं नाहींत. तुला माझा नमस्कार असो. त्याचप्रमाणें तूं आत्म्यामध्यें रममाण होऊन त्यांतच आनंद मानणारा आहेस, शान्त आहेस व मोक्ष देणारा आहेस. तुला नमस्कार असो ॥ २७ ॥

हे श्रीकृष्णा ! तूं काल आहेस, शंकर आहेस, तुला जन्ममरणादि उपाधि नाहींत, तूं सर्वव्यापी आहेस, सर्व ठिकाणीं तूं समबुद्धीनें वावरणारा आहेस, असें मी तुला मानित्यें. सर्व प्राणिमात्रांत एकमेकांमध्यें कलह उत्पन्न होण्यास निमितमात्रहि तूंच आहेस असें मी मानित्यें ॥ २८ ॥

हे श्रीकृष्णा ! कोणताहि पुरुष, मनुष्ययोनींत अवतार घेऊन मनुष्यांप्रमाणें कृति करणाऱ्या अशा तुझ्या मनांतील अभिप्राय जाणत नाहीं. परमेश्वराबद्दल मनुष्याची बुद्धि कलुषित झालेली असते; पण त्याला मात्र कोणीहि मित्र नाहींत व कोणींहि शत्रु नाहींत ॥ २९ ॥

हे श्रीकृष्णा ! तूं सर्व जगांत आत्मस्वरूपानें राहणारा आहेस. तुला जन्म नाहीं व कर्तृत्वाचा अभिमानहि नाहीं. तूं सर्वव्यापी परमेश्वर असूनहि पशुयोनींत वराहादि, मनुष्ययोनींत रामादि, ऋषियोनींत व्यासादि व जलचरयोनींत मत्स्यादि अवतार घेऊन व त्या त्या योनीला अनुरूप कर्मे करून त्यांचें हुबेहुब अनुकरण करतोस ॥ ३० ॥

बाळपणीं तूं मोठमोठे अपराध केल्यामुळें जेव्हां तुझी माता यशोदा, हातांत दावें घेऊन तुला बांधण्यास तयार झाली, तेव्हां 'मी भ्यायलों आहें' असा आविर्भाव आणून व डोळ्यांत अश्रु आणून तूं मुळूमुळू रडूं लागलास; तेव्हां तुझें मुख अश्रूंनीं भिजलेल्या काजळानें भरून गेलेल्या नेत्रांनीं अधिक शोभूं लागलें व तूं तें भीतीनें खालीं घालून उभा राहिलास. ती तुझी अवस्था आज मला मोह उत्पन्न करते. खरोखर भीतीसुद्धां त्या तुझ्या ह्या अवस्थेला भिते ॥ ३१ ॥

कित्येक लोक असें म्हणतात कीं, ज्याप्रमाणें मलयपर्वताची कीर्ति सर्वत्र फांकण्याकरितां त्यावर चन्दनवृक्षाची उत्पत्ति झाली, त्याचप्रमाणें तुला अत्यंत प्रिय व पुण्यवान् अशा धर्मराजाचा लौकिक त्रैलोक्यांत पसरावा, एवढ्याचकरितां आपण जन्मरहित असतांहि यादवकुळांत जन्म घेतला ॥ ३२ ॥

दुसरे असें म्हणतात कीं, हे श्रीकृष्णा ! तूं स्वतः जन्मरहित असूनहि भक्तांच्या प्रार्थनेवरून जगाच्या कल्याणाकरितां व दैत्यांच्या नाशाकरितां वसुदेवाची पत्नी जी देवकी तिचे ठिकाणीं अवतीर्ण झालास ॥ ३३ ॥

आणखी दुसरे असेंहि म्हणतात कीं, हे श्रीकृष्णा ! जशी समुद्रांत सांपडलेली नौका ओझ्यानें दबून जाते, तशी दुष्ट दैत्यांच्या भारानें दबून गेलेली व दुःखी झालेली जी पृथ्वी, तिचा भार दूर करा, अशी ब्रह्मदेवानें प्रार्थना केली असतां तूं ह्या पृथ्वीतलावर यदुकुळांत अवतार घेतलास ॥ ३ ॥

कांहीं लोक असेंहि समजतात कीं, हे श्रीकृष्णा ! अज्ञानामुळें अनेक काम्यकर्में करून दुःख भोगीत असलेल्या लोकांना संसारसागर तरून जाण्यासाठीं श्रवण व स्मरण करण्यास योग्य अशीं पराक्रमाचीं कृत्यें करण्याकरितां तूं अवतरलास ॥ ३५ ॥

जे लोक तुझ्या इष्ट अशा चरित्रांचें नेहमीं श्रवण करतात, वर्णन करतात, स्मरण करतात व त्यायोगें आनन्दित होतात, त्यानांच संसाररूपी पाण्याच्या प्रवाहाला बांधाप्रमाणें प्रतिबंध करून टाकणाऱ्या तुझ्या चरणकमलाचें दर्शन लवकर घडतें ॥ ३६ ॥

आणि हे भक्तांच्या इच्छा पूर्ण करणाऱ्या श्रीकृष्णा ! आम्ही युद्धांत अनेक राजांना मारल्यामुळें राजांच्या बाबतींत मोठेंच पाप केलें आहे. आम्हांला तुझ्या चरणकमलाशिवाय दुसरें कांहींच श्रेष्ठ नाहीं. तेव्हां तुला मित्राप्रमाणें असणाऱ्या व केवळ तुझ्यावरच जीव ठेवून अवलंबून राहिलेल्या आम्हांला आज तूं सोडून जातोस काय ? ॥ ३७ ॥

हे श्रीकृष्णा ! तूं आमच्या इन्द्रियांचा चालकच जणुं आहेस म्हणून जर ह्यापुढें तुझें दर्शन घडणार नाहीं तर यादव आणि पांडव अशा या आमच्या नांवांना व रूपांना कोण विचारतो ? ॥ ३८ ॥

हे श्रीकृष्णा ! आज शङ्खचक्रादि चिह्नांनीं युक्त अशा तुझ्या पायांचीं चिंन्हें उमटल्यामुळें ही येथील भूमि शोभत आहे; पण तूं द्वारकेला निघून गेल्यानंतर तशी ही शोभणार नाहीं ॥ ३९ ॥

हे श्रीकृष्णा ! तुझ्या कृपाकटाक्षानेंच उत्तम पक्व औषधि आणि वेली यांनीं युक्त असे हे देश समृद्ध झाले आहेत आणि अरण्यें, पर्वत, नद्या व समुद्र हे वाढत आहेत ॥ ४० ॥

हे जगाच्या चालका श्रीकृष्णा ! तूं स्वतः अनेक प्रकारचीं स्वरूपें घेऊन जगांत वावरणारा आहेस. तेव्हां माझी तुझ्या चरणकमलापाशीं अशी प्रार्थना आहे कीं, हे माझे बंधु पांडव व हे माझे संबंधी यादव ह्यांच्याविषयींचा माझा जो बळकट प्रेमपाश तो तूं तोडून टाक ! ॥ ४१ ॥

हे श्रीकृष्णा ! ज्याप्रमाणें गंगा आपला जलप्रवाह समुद्रांत मोठ्या प्रेमानें नेते, त्याप्रमाणें केवळ तुझेंच भजन करणाऱ्या माझ्या बुद्धीला तुझ्याच ठिकाणीं उत्तम रीतीनें निरंतर प्रेम करूं दे ! ॥ ४२ ॥

हे श्रीकृष्णा ! अर्जुनाचा तूं मित्र आहेस व यादवांत श्रेष्ठ आहेस. पृथ्वीला भारभूत होऊन उपद्रव देणाऱ्या संपूर्ण दुष्ट राजांच्या पराक्रमाला तूं अग्नीप्रमाणें जाळणारा

आहेस. तुझें सामर्थ्य कधींहि नाश पावत नाहीं. तूं पृथ्वीचें रक्षण करणारा असून गाई, द्विज व देव यांच्यावरील संकटें नाहींशी करण्याकरितां अनेक अवतार धारण करतोस. तूं योगांचा अधिपति व त्रैलोक्याचा गुरु आहेस. हे षड्गुणैश्वर्यसंपन्ना श्रीकृष्णा ! तुला माझा नमस्कार असो ! ॥ ४३ ॥

सूत म्हणाले, शौनक हो ! याप्रमाणें कुंतीनें गोड शब्दांनीं श्रीकृष्णाचा संपूर्ण पराक्रम वर्णिला असतां, श्रीकृष्णानें तिला मायेनें[1] मोह उत्पन्न करण्याकरितांच कीं काय हळूहळू स्मित हास्य केलें ॥ ४४ ॥

हस्तिनापुरांत प्रवेश केल्यावर श्रीकृष्णानें कुंतीच्या विनंतीला होय म्हणून म्हटलें. नंतर तो तिचा आणि पांडवस्त्रियांचा निरोप घेऊन आपल्या नगरीस जावयास निघाला असतां धर्मराजानें प्रेमामुळें त्याला जाऊं दिलें नाहीं ॥ ४५ ॥

ईश्वराच्या मनांतील अभिप्राय न समजणाऱ्या अशा व्यासादिकांनीं तसेंच अलौकिक कृत्यें करणाऱ्या श्रीकृष्णानेंहि धर्मराजाला इतिहास सांगून उपदेश केला; परंतु दुःखानें विव्हळ झाल्यामुळें त्याला तो समजला नाहीं ॥ ४६ ॥

हे शौनक ऋषि हो, आपल्या इष्टमित्रांचा झालेला नाश मनांत आल्यामुळें कोमल मनाच्या त्या युधिष्ठिर राजाला प्रेमाच्या मोहानें घेरलें आणि तो श्रीकृष्णाला म्हणाला ॥ ४७ ॥

दुष्ट अन्तःकरणाच्या अशा माझ्या हृदयांत वाढलेलें केवढें हो हें अज्ञान ! पाहा ! कोल्ह्याकुत्र्यांच्या हवालीं होणारा जो हा माझा देह त्याच्याकरितां माझ्याकडून केवळ राज्याच्याच आशेनें किती तरी अक्षौहिणी[2] सैन्य मारलें गेलें ॥ ४८ ॥

हे श्रीकृष्णा ! मी स्वार्थाकरितां हें महायुद्ध उपस्थित करून लहानलहान बालकें, सज्जन, स्नेही, भीष्मादिकांसारखे वडील, दुर्योधनादि भाऊबंद, द्रोणाचार्यांसारखे गुरु ह्या सर्वांशीं शत्रुत्व केलें. त्यामुळें कोट्यवधि[3] वर्षांनीं तरी नरकांतून माझी सुटका होईल कीं नाहीं, ह्याची शंकाच वाटते ॥ ४९ ॥

---

१ **'हासो जनोन्मादकरी च माया'** आपण जिला माया म्हणतों ती माया दुसरी तिसरी कोणी नसून श्रीपरमेश्वराचें जें मंद हास्य, तीच सर्व जगाला मोहित करणारी त्याची माया होय.

२ अक्षौहिणी सेनेचें प्रमाण पुढीलप्रमाणें आहे : एक हत्ती, एक रथ, तीन घोडे व पांच पायदळ ह्या दहांची एक तुकडी, अशा दहादहांच्या तीन तुकड्यांना मिळून एक सेनामुख अशी संज्ञा आहे. तीन सेनामुख म्हणजे गुल्म, तीन गुल्म म्हणजे गण, तीन गण म्हणजे वाहिनी, तीन वाहिनी म्हणजे पृतना, तीन पृतना म्हणजे चमू, तीन चमू म्हणजे अनीकिनी व दहा अनीकिनी म्हणजे एक अक्षौणी. एका अक्षौहिणींत २१८७०० इतकें सैन्य असतें.

३ **वर्षायुतायुतैः**— अयुत म्हणजे दहा हजार, दहा हजारांचे दहा हजार म्हणजे दहा कोटी वर्षे, असा वर्षायुतायुत शब्दाचा अर्थ आहे; परंतु येथें दहा कोटी ही

प्रजेचें पालन करणाऱ्या राजाला, धर्मरक्षणाकरितां युद्ध करावें लागून शत्रूंचा नाश करावा लागला तरी तें पाप होत नाहीं, असें आपल्या शास्त्रांत सांगितलें आहे; परंतु माझ्या मनाचें त्यानें समाधान होणें शक्य नाहीं ॥ ५० ॥

माझ्यासाठीं वध पावलेल्या बांधवांच्या स्त्रियांचा जो हा माझ्याकडून द्रोह घडला, त्याचें निराकरण गृहस्थाश्रमी पुरुषांनीं करावयाच्या अश्वमेधादि कर्मांनीं होणें शक्य नाहीं ॥ ५१ ॥

जसें गढूळ पाणी चिखल टाकून स्वच्छ होणार नाहीं किंवा जास्ती दारू पिण्यानें दारू प्यायल्याचें पाप नाहींसें होणार नाहीं, तसें एका प्राणिहत्येचें पाप ज्यांत अन्य प्राण्यांची हत्या आहे अशा यज्ञांनीं नाहींसें होणार नाहीं ॥ ५२ ॥

---

विशिष्ट संख्या दर्शविण्याचा व्यासांचा उद्देश नसून त्यांनीं वर्षायुतायुत हा शब्द कोट्यवधि, अनंत, असंख्य, अगणित अशा अर्थानेंच योजिला आहे.

## आठवा अध्याय समाप्त

# अध्याय ९ वा

सूत म्हणाले, शौनकादि ऋषि हो ! प्रजेशीं आपण वैर करून जो आप्तेष्टांचा वध केला, हें मोठेंच पाप केलें असें समजून भ्यालेला युधिष्ठिर 'धर्म म्हणजे काय वस्तु आहे,' हें ओळखून त्याचा निर्णय करावा, असें मनांत आणून जेथें भीष्म शरपंजरीं पडले होते, अशा कुरुक्षेत्राला जाण्यास निघाला ॥ १ ॥

त्या वेळीं भीम, अर्जुन वगैरे सगळे भाऊ आणि व्यास, धौम्य वगैरे ब्राह्मणहि उत्तम घोडे जुंपलेल्या व सोन्यानें मढविलेल्या अशा रथांत बसून त्याजबरोबर निघाले ॥२॥

शौनक हो ! त्या वेळीं अर्जुनासहवर्तमान श्रीकृष्णहि रथांत बसून कुरुक्षेत्राला जाण्यास निघाला आणि ज्याप्रमाणें यक्षांनीं वेढलेला कुबेर शोभतो त्याप्रमाणें भीमादि भाऊ, व्यासादि ब्राह्मण व श्रीकृष्णादि इतर थोर पुरुष यांसहवर्तमान निघालेला तो धर्मराजा शोभला ॥ ३ ॥

आपल्याला अनुसरणारे ऋषिवृंद आणि श्रीकृष्ण यांसह पांडवांनीं कुरुक्षेत्रांत येऊन, स्वर्गांतून पडलेला देवच कीं काय अशाप्रमाणें, शरपंजरीं पडलेल्या भीष्माला पाहून नमस्कार केला ॥ ४ ॥

हे साधुश्रेष्ठ शौनका ! त्या कुरुक्षेत्रांत भरतकुळांत श्रेष्ठ अशा भीष्माला पाहण्याकरितां व्यास-वसिष्ठादि सगळे ब्रह्मर्षि, नारदादि देवर्षि व बृहदश्वादि राजर्षि मोठ्या उत्कंठेनें प्राप्त झाले ॥ ५ ॥

पर्वत, नारद, धौम्य, षड्गुणैश्वर्यसंपन्न व्यास, बृहदश्व, भारद्वाज आणि शिष्यांसह रेणुकेचा पुत्र परशुराम, तसेंच ॥ ६ ॥

वसिष्ठ, इन्द्रप्रमद, त्रित, गृत्समद, असित, कक्षीवान्, गौतम, अत्रि, विश्वामित्र आणि सुदर्शन ॥ ७ ॥

अहो शौनकादि ऋषि हो ! त्याचप्रमाणें दुसरेहि शुक्राचार्य, कश्यप, अङ्गिरस इत्यादि महर्षि शिष्यांसह तेथें आले ॥ ८ ॥

देशकालानुसार सर्व धर्म जाणणाऱ्या व आठ वसूंमध्यें श्रेष्ठ[1] अशा त्या भीष्मानें आपल्या भेटीकरितां आलेल्या मोठमोठ्या ऋषींना पाहून त्यांचा सत्कार केला ॥ ९ ॥

नंतर हृदयांत वास करणारा, सर्व जगाचा अधिपति व ज्यानें मायेनें शरीर धारण केलें आहे, असा तो श्रीकृष्ण, आसनावर बसला असतां त्याचा पराक्रम जाणणाऱ्या भीष्मानें त्याला नमस्कार केला ॥ १० ॥

---

१. वसूत्तम हें भीष्माला नांव पडण्याचें कारण, भीष्म हा आठ वसूंनीं भूतलांवर घेतलेल्या आठ अवतारांपैकीं एक आहे. वसूंना जेव्हां शाप झाला कीं, तुम्ही मृत्युलोकावर मनुष्ययोनींत अवतीर्ण व्हा, एकेक वसूचा शंतनूपासून गंगेच्या ठिकाणीं जन्म झाला

नम्रता व प्रेम यांनीं युक्त अशा आपल्या शेजारच्या आसनावर बसले त्या त्या पांडवांकडे पाहून भीष्माचे डोळे पाण्यानें भरून आले व तो त्यांना उद्देशून म्हताला ॥ ११ ॥

पांडव हो ! ब्राह्मणांस पूज्य मानणारे, धर्मानें आचरण करणारे आणि श्रीकृष्णाच्या आश्रयाखालीं राहणारे असे जे तुम्ही त्या तुम्हांवर अशा दुःखांत आयुष्य कंठण्याचा प्रसंग यावा ही केवढी अन्यायाची गोष्ट ! ॥ १२ ॥

अतिरथी असा जो पांडु तो मृत झाला असतां बालकें लहान असलेली आमची लेंकुरवाळी सून जी कुंती तिनें तुमच्या सुखाकरितां वारंवार पुष्कळ दुःखें सहन केलीं॥ १३॥

पांडव हो ! आणखी आपणांला आतांपर्यंत जें दुःख सोसावें लागलें तें खरोखर काळाच्या सपाट्यांत सापडल्यामुळेंच सोसायें लागलें, असें मला वाटतें. ज्याप्रमाणें मेघ हे वायूच्या ताब्यांत असतात, त्याप्रमाणें लोकपालांसह सर्व जग काळाच्या ताब्यांत आहे ॥ १४ ॥

जेथें युधिष्ठिरासारखा धार्मिक राजा, हातांत गदा धारण करणारा भीम, हातांत गांडीव धनुष्य घेऊन सज्ज असा सर्व शस्त्रास्त्रें जाणणारा अर्जुन व श्रीकृष्णासारखा मित्र असा योग आहे तेथेंहि आपत्ति असावी काय ? ॥ १५ ॥

हे राजा युधिष्ठिरा ! श्रीकृष्णाच्या मनांत कायकाय गोष्टी करावयाच्या आहेत त्या मनुष्याला कधींहि समजणें शक्य नाहीं. श्रीकृष्णाचा पराक्रम व त्याचे गुण जाणण्याकरितां मोठमोठे विद्वान् सुद्धां वेडे बनतात ॥ १६ ॥

हे भरतश्रेष्ठा युधिष्ठिरा ! ह्याकरितां सर्व कांहीं दैवाधीन आहे असें तूं निश्चयपूर्वक समज; आणि हे धर्मराजा ! त्या श्रीकृष्णाच्या आज्ञेप्रमाणें वागून दुर्बल व तुझ्यावरच अवलंबून राहणाऱ्या अशा अनाथ प्रजांचें तूं रक्षण करा ॥ १७ ॥

हा प्रभु श्रीकृष्ण षड्गुणैश्वर्यसंपन्न असून प्रत्यक्ष सर्वांचा आदि असणारा श्रेष्ठ जलशायी परमेश्वर होय. मायेनें संपूर्ण जगाला मोह उत्पन्न करणारा असा हाच यादवकुळांत मनुष्यरूपानें वावरत आहे ॥ १८ ॥

हे राजा युधिष्ठिरा ! षड्गुणैश्वर्यसंपन्न शंकर, देवर्षि नारद, तसेंच प्रत्यक्ष भगवान् कपिलमहामुनि हेच ह्या श्रीकृष्णाचा पराक्रम जाणतात ॥ १९ ॥

---

व पूर्वसंकेताप्रमाणें गंगेनें त्या त्या मुलाला जन्मतःच पाण्यांत सोडलें. अशा रीतीनें सात वसूंच्या अवतारांनीं झालेले सात पुत्र गंगेनें पाण्यांत सोडले. जेव्हां आठव्या वसूच्या अवताराचा आठवा पुत्र पाण्यांत सोडण्यास गंगा तयार झाली तेव्हां शंतनूनें तिला पुष्कळ विनविलें व आठव्या पुत्राला जगविलें. तोच हा भीष्म होय. हा इच्छामरणी, नैष्ठिक ब्रह्मचारी व महापराक्रमी होता. वसूंचा मुख्य अवतार असल्यामुळें ह्याला वसूत्तम असें म्हटलें आहे.

या श्रीकृष्णाला 'हा माझा मामेभाऊ, आवडता मित्र, व सज्जन' असें तूं मानतोस. त्याला तूं प्रधानाचें काम सांगितलेंस, दूत केलेंस आणि त्याच्याकडून प्रेमामुळें सारथ्यहि करविलेंस ॥ २० ॥

श्रीकृष्ण हा सर्वव्यापी, समदृष्टि, द्वैतभावरहित आणि निरहंकार असल्यामुळें तुझ्याकडून त्याच्याशीं झालेल्या वर्तनाविषयीं, निर्दोष अशा त्याच्या बुद्धींत वैषम्याला कोठें थाराच मिळण्यासारखा नाहीं ॥ २१ ॥

हे धर्मराजा, तसेंच एकनिष्ठ भक्तावर परमेश्वराचें किती प्रेम असतें पाहा ! कारण, मीं प्राणांचा त्याग करण्याच्या वेळींच स्वतः श्रीकृष्ण मला दर्शन देण्यासाठीं येथें प्राप्त झाला ॥ २२ ॥

जो योगी परमेश्वराच्या ठिकाणीं मन लावून त्याचें अहोरात्र नामग्रहण करणारा आहे व जो अशा रीतीनें ईश्वरनामाचें ग्रहण करतां करतां देहत्याग करतो, तो काम्य-कर्मापासून मुक्त होतो ॥ २३ ॥

प्रसन्न होऊन केलेल्या हास्यानें आणि आरक्त नेत्रांनीं ज्याचें मुखकमल शोभायमान झालें आहे, असा हा ध्यानमार्गानेंच जाणता येण्यासारखा देवांचा देव चतुर्भुज भगवान् श्रीकृष्ण, मीं शरीर सोडून जाईपर्यंत माझ्याकडे पाहत राहो ! ॥ २४ ॥

सूत म्हणतात, शौनक हो ! धर्मराजानें ह्याप्रमाणें भीष्माचार्यांचें भाषण ऐकून घेऊन, श्रवण करण्याच्या लालसेनें उत्कंठित झालेल्या ऋषींच्या समक्ष शरपञ्जरीं पडलेल्या भीष्माला अनेक प्रकारच्या धर्माविषयीं प्रश्न विचारले ॥ २५ ॥

मनुष्यस्वभावाप्रमाणें चारहि वर्ण व चारहि आश्रम यांच्या आश्रयानें राहणारे, आणि विषयलंपट जन व विषयांवर आसक्ति न ठेवणारे योगी अशा ह्या दोन्ही प्रकारच्या लोकांना निरनिराळ्या प्रकारें शास्त्रांत दाखविलेले जे भिन्नभिन्न धर्ममार्ग ते सर्व—॥ २६ ॥

दानधर्म, राजधर्म, मोक्षधर्म, स्त्रीधर्म व वैष्णवधर्म भीष्माचार्यानें युधिष्ठिराला प्रकरणवार कोठें संक्षेपानें तर कोठें विस्तृत रीतीनें असे सांगितले ॥ २७ ॥

शौनक हो ! तसेंच सर्वज्ञ अशा भीष्माचार्यानें अनेक आख्यानें व अनेक इतिहास सांगून तद्द्वारा धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चार पुरुषार्थांचें त्यांच्या साधनांसह शास्त्रपद्धतीप्रमाणें वर्णन करून युधिष्ठिराला सांगितलें ॥ २८ ॥

ह्याप्रमाणें युधिष्ठिराला यथाशास्त्र धर्म सांगत असतां, योगी आणि इच्छामरणी अशा भीष्माला जो इष्ट वाटत होता तो उत्तरायणाचा काळ येऊन ठेपला ॥ २९ ॥

तेव्हां हजारों योद्धयांचा पुढारी होण्यास योग्य अशा त्या भीष्माचार्यांनीं तत्काळ बोलण्याचें बंद केलें आणि दृष्टि एकाग्र करून सर्व जगताचा आदि असून जो सर्वव्यापी आहे, ज्यानें पीतांबर परिधान केला आहे व जो आपल्यापुढें उभा आहे, अशा त्या चतुर्भुज श्रीकृष्णाच्या ठायीं मनाची एकाग्रता केली ॥ ३० ॥

अत्यंत शुद्ध अशा धारणायोगानें ज्याचें सर्व पाप नष्ट झालें आहे व युद्ध करीत असतां श्रीकृष्णाच्या दर्शनानें, शस्त्रास्त्रांच्या प्रहारापासून झालेले श्रम आणि संपूर्ण विषयासंबंधीं इच्छा ज्याच्या पार नाहींशा झालेल्या आहेत अशा भीष्मांनीं देहत्याग करीत असतां श्रीकृष्णाची स्तुति करण्यास प्रारंभ केला ॥ ३१ ॥

भीष्म श्रीकृष्णाची स्तुति करतांना म्हणतातः– हे भगवान् श्रीकृष्णा ! माझी निष्काम अशी सात्त्विक बुद्धि तुझ्या ठिकाणीं मीं स्थिर केली आहे. सर्व त्रैलोक्याहून तूं मोठा आहेस. तूं स्वतःच्याच म्हणजे आत्म्याच्याच सुखांत गुंग होऊन तेथें आत्म्यामध्येंच रममाण होत आहेस. ज्या मायेच्या योगें हा संसारप्रवाह सुरू झाला, त्याच मायेला बरोबर घेऊन कधीं कधीं तूं अनेक प्रकारच्या क्रीडा करतोस. तूं सर्व यादवगणांत मुख्य असून सर्वगुणसंपन्न आहेस ॥ ३२ ॥

हे श्रीकृष्णा ! तूं त्रैलोक्यसुंदर असून तुझी अंगकांति तमालपत्राप्रमाणें कृष्णवर्णाची आहे. तूं सूर्यकिरणाप्रमाणें अत्यंत तेजस्वी असें उत्तम वस्त्र परिधान केलें आहेस. तुझ्या मुखकमळावर कुरळ केशकलाप पसरल्यामुळें तुझें शरीर फारच शोभायमान दिसत आहे. तूं अर्जुनाशीं मित्रत्वानें वागणारा आहेस. अशा तुझ्या ठिकाणीं माझें नेहमीं निर्दोष प्रेम असो ॥ ३३ ॥

युद्धांत घोड्यांच्या खुरांनीं उडालेल्या धुळीनें मळलेले आणि वाऱ्यानें हलणारे केश आड येऊन श्रमजन्य घामाच्या धारा सुटल्यामुळें ज्याचें मुखकमल शोभायमान झालें आहे, ज्याच्या शरीराची त्वचा माझ्या तीक्ष्ण बाणांनीं छिन्नविच्छिन्न झाली आहे आणि ज्यानें तेजस्वी चिलखत धारण केलें आहे, अशा श्रीकृष्णाच्या ठिकाणीं माझें मन राहो ॥ ३४ ॥

आपला मित्र जो अर्जुन त्याचें भाषण ऐकून तत्काळ ज्यानें दोन्ही सैन्यांच्या मध्यें रथ आणून उभा केला, आणि शत्रूंच्या सैनिकांचें आयुष्य डोळ्यांनींच ज्यानें हरण केलें, त्या पार्थसख्या श्रीकृष्णाच्या ठिकाणीं माझें प्रेम असो ॥ ३५ ॥

---

१ धारणा हा अष्टांग योगापैकीं एक योग आहे. ' धारणा ' हा ध्यानयोगानंतरचा आहे. ध्यानयोगानें इष्ट देवतेची मूर्ति हृदयांत चिंतन करू आणणें व धारणायोगानें चिंति-लेल्या इष्ट देवतेच्या मूर्तीचें स्थिरीकरण करणें, हा योगाचा क्रम आहे. भीष्मानें प्रथम पुढें उभा राहिलेल्या श्रीकृष्णाचें डोळे मिटून ध्यान केलें व चिंतनानें ती श्रीकृष्णमूर्ति हृदयांत प्रगट केली व नंतर तीच श्रीकृष्णमूर्ति धारणेच्या योगें स्थिर केली. अशा रीतीनें भीष्मानें हृदयांत प्रगट झालेल्या श्रीकृष्णमूर्तीचें चिंतन करीत व त्याकडे पाहात स्वदेहाचें विसर्जन केलें.

शत्रुसैन्याच्या अग्रभागीं राहिलेल्या भीष्मादिकांना पाहून अर्जुनाला जेव्हां भाऊबंदांना मारणें हा मोठा दोष आहे असें वाटलें व तो युद्ध करीनासा झाला, तेव्हां त्याला आत्मज्ञानाच्या[१] पुष्कळ गोष्टी सांगून ज्यानें त्याचें अज्ञान दूर केलें, त्या श्रीकृष्ण परमात्म्याच्या चरणकमलाचे ठिकाणीं माझें प्रेम राहो ॥ ३६ ॥

आपली प्रतिज्ञा[२] मोडून माझी प्रतिज्ञा खरी करण्याकरितां रथांतून त्यानें खालीं उडी टाकिली व अंगावरील खालीं पडलेलें अंगवस्त्रहि न सांवरतां हातांत रथाचें चाक घेऊन जसा सिंह हत्तीला मारायला धावतो त्याप्रमाणें तो भूमीला कंप उत्पन्न करीत मजवर चाल करून आला ॥ ३७ ॥

आततायी होऊन जेव्हां मीं तीक्ष्ण बाणांनीं त्याला विद्ध केलें, तेव्हां कवच छिन्न होऊन अंग रक्तानें माखल्यामुळें जो माझा वध करण्याकरितां जोरानें धावून आला, तो भगवान् श्रीकृष्ण मला सद्गति देवो ! ॥ ३८ ॥

अर्जुनाचा रथ हाच ज्याचा सारा परिवार व हातांत चाबूक आणि घोड्यांचे लगाम धरल्यामुळें ज्याला एक प्रकारची विशेष शोभा आली होती त्या भगवान् श्रीकृष्णाच्या ठिकाणीं मृत्युसमयीं माझें प्रेम असो ! त्याचें दर्शन होऊन जे वध पावले त्यांना कृष्णस्वरूपाची प्राप्ति झाली ॥ ३९ ॥

सुंदर चालणें, क्रीडा, मंद हास्य, आणि प्रेमाचे कटाक्ष यांच्या योगानें ज्यांचा कृष्णानें बहुमान केला, त्या अभिमानानें अंध झालेल्या गोपस्त्रिया कृष्णाच्या कृतींचें अनुकरण करूनच खरोखर कृष्णस्वरूपास प्राप्त झाल्या ॥ ४० ॥

धर्मराजाच्या राजसूययज्ञांत अनेक ऋषि व मोठमोठे राजे एकत्र जमले असतां सुद्धां त्या सभेंत प्रेक्षणीय अशा ह्या श्रीकृष्णाला अग्रपूजेचा मान मिळाला. अशा ह्या सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं आत्मस्वरूपानें राहणाऱ्या श्रीकृष्णाचें मला आज दर्शन घडलें!॥ ४१ ॥

माझी भेदबुद्धि समूळ नाहींशी झाली आहे. आत्म्याच्या योगें निर्माण झालेल्या प्राण्यांच्या प्रत्येक हृदयांत आत्मरूपानें सांठविलेला आणि वस्तुतः एक असून, सूर्य ज्याप्रमाणें एक असून लोकांच्या दृष्टीला निरनिराळ्या रीतीनें भासतो त्याचप्रमाणें, जो अनेकरूपें धारण केल्याप्रमाणें भासतो; तसेंच ज्याला जन्ममरणादि उपाधि नाहींत, अशा ह्या श्रीकृष्णाच्या स्वरूपांत मी लीन झालों आहें ॥ ४२ ॥

सूत म्हणतातः—शौनक हो ! ह्याप्रमाणें भीष्माचार्यांनीं त्या षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीकृष्णाच्या ठिकाणीं आपल्या संकल्पविकल्पादि मनाच्या क्रिया, भाषणादि वाणींच्या क्रिया

---

१ हेंच आत्मज्ञान श्रीमद्भगवद्गीतेच्या रूपानें श्रीकृष्णानें अर्जुनाला उपदेशिलें. त्यांत हा सर्व कथाभाग आलेला आहे.

२ 'न धरीं शस्त्र करीं मी गोष्टी सांगेन युक्तिच्या चार' अशी श्रीकृष्णानें प्रतिज्ञा केली होती; पण ती प्रतिज्ञा भीष्मानें मोडायला लावून श्रीकृष्णाला हातांत चक्र धरावयाला लाविलें.

आणि अवलोकनादि नेत्राच्या क्रिया, ह्यांसह आत्म्याला लीन करून व श्वासोच्छ्वास आंतल्याआंत रुद्ध करून आपला देह ठेवला ॥ ४३ ॥

सर्वोपाधिरहित अशा ब्रह्मामध्यें भीष्माचार्य लीन झाले आहेत असें पाहून ज्याप्रमाणें संध्याकाळीं पक्षी आपआपल्या घरट्यांत शांतपणें येऊन बसतात, त्याप्रमाणें ती सर्व मंडळी शान्तपणें बसली ॥ ४४ ॥

जेथें भीष्माचार्यांनीं देह ठेवला, त्या कुरुक्षेत्रांत देव व मनुष्य यांनीं दुंदुभि वाजविण्यास सुरवात केली. सज्जन राजे भीष्माचार्यांची स्तुति करूं लागले व आकाशांतून फुलांचे वर्षावहि झाले ॥ ४५ ॥

शौनक हो ! भीष्माचार्य निजधामाला म्हणजे परलोकाला गेले असतां युधिष्ठिरानें त्यांचीं दहनादि उत्तरकृत्यें करविलीं व कांहीं वेळपर्यंत त्यांच्या निधनाबद्दल फारच शोक केला ॥ ४६ ॥

श्रीकृष्णाला पाहून सर्व ऋषींना मोठा आनंद झाला आणि ते त्याची अनेक रहस्य-पूर्ण नांवांनीं स्तुति करूं लागले. नंतर कृष्णावर अनन्य भक्ति ठेवणारे ते सर्व महर्षि, पुनः त्याचें चिंतन करीत करीत आपापल्या आश्रमाला गेले ॥ ४७ ॥

नंतर श्रीकृष्णाला बरोबर घेऊन धर्मराज हस्तिनापुरांत गेले व त्यांनीं पित्याप्रमाणें मानलेल्या धृतराष्ट्राला व पुण्यशील गांधारीला अनेक गोष्टी सांगून त्यांचें समाधान केलें ॥ ४८ ॥

मग कर्तुं, अकर्तुं व अन्यथाकर्तुं शक्ति प्राप्त झालेल्या धर्मराजानें धृतराष्ट्राच्या अनुज्ञेनें व श्रीकृष्णाच्या संमतीनें वडिलोपार्जित राज्यशकट धर्माप्रमाणें हांकण्यास सुरवात केली ॥ ४९ ॥

॥ **नववा अध्याय समाप्त** ॥

---

# अध्याय १० वा

शौनक म्हणाले: —सूत हो ! पांडवांचा उत्कर्ष सहन न होऊन ज्या कौरवांनीं त्यांचें सर्वस्व हरण केलें व अधर्मानें त्यांना वनवासाला पाठविलें आणि उलट सशस्त्र सैन्य गोळा करून पांडवांशीं युद्ध करण्यास जे सिद्ध झाले, त्या कौरवादिकांचा नाश करून पांडवांनीं पुनः आपलें राज्य मिळविलें असतां भीमादि चार कनिष्ठ भावांसह धार्मिकांमध्यें श्रेष्ठ अशा धर्मराजानें राज्याचा गाडा कसा चालविला, पुढें त्यानें कोणकोणत्या गोष्टी केल्या, तें सांगा ॥ १ ॥

सूत म्हणाला: —शौनकऋषि हो ! कुरुकुलांत उत्पन्न झालेल्या कलहाग्नीनें त्या कुळाचा बहुतेक उच्छेद केला असतां त्यांत अंकुर उत्पन्न करून श्रीकृष्णानें युधिष्ठिराला त्याच्या सिंहासनावर बसविलें व त्यायोगें संसाराचा उत्कर्ष करणाऱ्या सर्वैश्वर्यसंपन्न अशा त्या श्रीहरीच्या मनाला आनंद झाला ॥ २ ॥

भीष्मानें केलेले अनेक धर्मांचे उपदेश, तशाच भगवान् श्रीकृष्णानें सांगितलेल्या अनेक कल्याणाच्या गोष्टी ऐकून धर्मराजाचें सर्व मोहजन्य अज्ञान नष्ट झालें आणि श्रीकृष्णाच्या आश्रयानें व भीमादि चार भावांच्या साहाय्यानें त्यानें सर्व समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य इंद्राप्रमाणें केलें ॥ ३ ॥

धर्मराज राज्य करीत असतां त्याच्या राज्यांत नेहमीं योग्य काळीं पुष्कळ पाऊस पडूं लागला. पृथ्वीवर वाटतील ते जिन्नस पिकूं लागले, तसेंच दुधानें ओथंबलेल्या ओटया असलेल्या गाई मोठ्या आनंदानें गोठ्यांत दुधाचा सडा घालूं लागल्या ॥ ४ ॥

त्या धर्मराजाच्या कारकीर्दीत त्याच्या राज्यांतील सर्व नद्या नेहमीं पाण्यानें तुडुंब भरलेल्या असत . समुद्र व पर्वत हे आपापलीं कृत्यें योग्य वेळीं करीत असत. तसेंच वनस्पति, वेली आणि औषधीहि ऋतूंना अनुसरून पुष्कळ फळें देत ॥ ५ ॥

धर्मराजा राज्य करीत असतां त्याच्या राज्यांतील प्रजाजनांना कधींहि काळजी किंवा रोगराई, तसेंच देवता व भूतप्रेत यांची पीडा आणि शरीरजन्यक्लेश झाले नाहींत ॥ ६ ॥

मित्रांना झालेला कुलक्षयजन्य शोक दूर करण्याकरितां व सुभद्रेच्या फारच आग्रहावरून तिचें प्रिय करण्याकरितां कित्येक महिने श्रीकृष्ण हस्तिनापुरांत राहिले ॥ ७ ॥

नंतर धर्मराजाचा निरोप घेऊन त्याचें अनुमोदन मिळविल्यावर श्रीकृष्णानें त्याला आलिंगन दिलें आणि नमस्कार केला. त्या वेळीं श्रीकृष्णालाहि इतर कित्येकांनीं आलिंगन देऊन नमस्कार केला आणि द्वारकेस जावयासाठीं श्रीकृष्ण रथांत बसला ॥ ८ ॥

सुभद्रा, द्रौपदी, कुंती, तशीच उत्तरा, गांधारी आणि धृतराष्ट्र, युयुत्सु, कृपाचार्य, नकुळ व सहदेव, ॥ ९ ॥

तसेंच भीम, धौम्य, उत्तरा आदिकरून स्त्रिया आणि श्रीकृष्णाच्या अगाध मायेनें मोहित झालेले इतर पुरुष यांपैकीं कोणाला सुद्धां श्रीकृष्णाचा विरह सहन झाला नाहीं ॥ १० ॥

श्रीकृष्णाचें प्रिय असें यशोवर्णन केलेलें ऐकून ज्ञाता पुरुष साधूंच्या समागमाचा लाभ मिळाल्यामुळें दुष्ट संगतीपासून एकदां मुक्त झाला, म्हणजे तो तें यशःकीर्तन सोडून देण्यास केव्हांहि उद्युक्त होत नाहीं ॥ ११ ॥

नेहमीं कृष्णाचें दर्शन, त्याच्याबरोबर नेहमीं आलिंगन व भाषण व त्याच्याबरोबरच निजणें, बसणें, उठणें, भोजन वगैरे क्रिया नेहमीं झाल्यामुळें ज्यांचें मन श्रीकृष्णावर स्थिर झालें होतें, त्या पांडवांना त्याचा वियोग कसा सहन होणार? ॥ १२ ॥

श्रीकृष्णाशीं प्रेमानें बद्ध झालेल्या हस्तिनापुरांतील सर्व लोकांचीं मनें श्रीकृष्णाच्या मागोमाग धावूं लागलीं आणि त्यांचे डोळे पापण्या मिटूं न देतां त्याच्याकडे पाहात कृष्ण जाईल तिकडे फिरूं लागले ॥ १३ ॥

श्रीकृष्ण घरांतून बाहेर निघाला असतां द्रौपदी, सुभद्रा इत्यादि बांधवस्त्रियांनीं अशुभसूचक[1] असे विरहामुळें डोळ्यांतून गळूं पहाणारे अश्रु दुश्चिन्ह होऊं नये म्हणून आंतल्या आंत आवरून धरले ॥ १४ ॥

श्रीकृष्ण द्वारकेंत जाण्यास तयार झाला असतां जिकडेतिकडे मृदंग, शंख, नगारे, ढोल, वीणा, कर्णे, तुताऱ्या, शिंगें, धुंधुरी, आनक, घंटा इत्यादि वाद्यें वाजूं लागलीं ॥ १५ ॥

त्या श्रीकृष्णाला पाहण्याच्या इच्छेनें कुरुस्त्रिया वाड्याच्या गच्चीवर चढल्या आणि प्रेमानें व लज्जेनें हसत हसत श्रीकृष्णाकडे पाहत त्याच्यावर फुलांचा वर्षाव करूं लागल्या ॥ १६ ॥

रत्नमंडित मुठीचें व मोत्यांच्या हारांनीं भूषित केलेलें असें पांढरें छत्र श्रीकृष्णाचा आवडता जो गुडाकेश[2] अर्जुन त्यानें आपणास अत्यंत प्रिय अशा त्या श्रीकृष्णावर धरलें ॥ १७ ॥

---

१ कोणीं प्रवासाला निघाला असतां त्यानें नेत्राश्रूंचें अवलोकन करणें अशुभसूचक समजलें जातें, हें द्रौपद्यादि स्त्रियांना माहीत होतें. शास्त्रांत रडण्याची खोली घरामध्यें निराळी असावी असें सांगितलें आहे व रडून झाल्यानंतर स्नान, आचमन वगैरे क्रियांनीं देहशुद्धि केली पाहिजे, असा एक नियम सांगितला आहे.

२ गुडाकेश ह्या शब्दांत **गुडाका** व **ईश** असे दोन शब्द आहेत. ‘ गुडाका ’ म्हणजे निद्रा आणि ‘ ईश ’ म्हणजे स्वामी. ज्यानें निद्रा आपल्या ताब्यांत ठेविली आहे त्यास ‘ गुडाकेश ’ म्हणतात. अशी झोंप फक्त अर्जुनाच्या स्वाधीन असल्यामुळें त्यालाच गुडाकेश अशी संज्ञा प्राप्त झाली.

उद्धव व सात्यकी हे दोघे कृष्णावर चवऱ्या वारूं लागले व अशा रीतीनें तो श्रीकृष्ण राजमार्गांतून जात असतां अंगावर होणाऱ्या पुष्पवृष्टीनीं फारच शोभूं लागला ॥ १८ ॥

वस्तुतः निर्गुण परंतु भक्तांकरितां सगुणस्वरूप धारण करणाऱ्या त्या श्रीकृष्णा-संबंधानें वास्तविक योग्यायोग्यतेचा विचार ज्यांत नाहीं, पण एका अर्थी जे खरे आहेत असे ब्राह्मणांनीं उच्चारिलेले आशीर्वाद ठिकठिकाणीं ऐकूं येऊं लागले ॥ १९ ॥

पुण्यकीर्ति अशा श्रीकृष्णाच्या ठिकाणीं मन आसक्त झालेल्या त्या कौरव-स्त्रियांमध्यें सर्वांच्या कानाला गोड लागेल असें भाषणहि सुरू झालें ॥ २० ॥

गडे ! गुणोत्पत्तीपूर्वीच्या प्रलयकाळीं सर्व जग या एकट्यानेंच आपल्या ठिकाणीं लीन करून घेतलेलें असतें; त्या सर्व शक्ति सुप्तावस्थेंत असतांना तो सर्वांत तुल्यरूपानें होता. तो जो सर्वैश्वर्यसंपन्न आत्मरूपानें आत्म्यांत राहणारा पुराणपुरुष तोच हा श्रीकृष्ण होय ॥ २१ ॥

हा श्रीकृष्ण सर्व शास्त्रें निर्माण करणारा असून नामरूपरहित आत्म्याला नांवें व स्वरूपें देण्याच्या इच्छेनें तो आपल्याच सामर्थ्यानें आज्ञा दिलेल्या व जीवांना मोहित करणारी माया उत्पन्न करणाऱ्या प्रकृतीला अनुसरला आहे ॥ २२ ॥

इंद्रियांचा निग्रह व योगसामर्थ्यानें प्राणवायूचा विरोध करून ज्ञानी लोक भक्तियुक्त अंतःकरणानें त्याचें स्वरूप अवलोकन करतात तोच हा. हाच खरोखर सत्त्वगुणाची शुद्धि करण्यास योग्य आहे ॥ २३ ॥

गडे ! रहस्य जाणणाऱ्या विद्वानांनीं ज्याच्या रम्य कथा वेदांत व उपनिषदांत गायिल्या आहेत, जो एकच असून सहज लीलेनें जग उत्पन्न करतो, त्याचें रक्षण करतो व संहार करतो; पण त्यांत आसक्ति ठेवीत नाहीं, तोच हा परमेश्वर श्रीकृष्ण होय ॥ २४ ॥

ज्या ज्या वेळीं पृथ्वीवर अज्ञानी राजे अधर्माचें वर्तन चालवितात, त्या त्या वेळीं प्रत्येक युगांत सृष्टिकार्य उत्तम रीतीनें चालण्याकरितां अनेक स्वरूपें घेऊन सत्त्वगुणाच्या साहाय्यानें हाच श्रीकृष्ण ऐश्वर्य, सत्य, यथार्थ आचरण, दया वगैरे गुण धारण करतो ॥ २५ ॥

सर्व पुरुषांत अग्रगण्य व लक्ष्मीचा स्वामी असा तो कृष्णस्वरूपानें अवतीर्ण होऊन ज्या मधुवनांत नेहमीं वास करतो तें मधुवन किती पवित्र आहे बरें ! तसेंच ज्या यदुवंशांत त्यानें जन्म घेतला त्या यदुवंशाची थोरवी किती तरी वर्णन करावी ? ॥ २६ ॥

किती हो ही द्वारका, खरोखर स्वर्गाच्या कीर्तीला मागें सारणारी व पृथ्वीचें पुण्यकारक यश वाढविणारी आहे ! कारण श्रीकृष्णाची कृपा संपादन करण्याची इच्छा करणाऱ्या तेथील प्रजांना, स्मितपूर्वक प्रेमानें अवलोकन करणाऱ्या आपल्या स्वामीचें नित्य दर्शन घडत असतें ॥ २७ ॥

गडे ! ज्याचें पाणिग्रहण श्रीकृष्णानें केलें त्या स्त्रियांनीं खरोखर पूर्वी पुष्कळ व्रतें, तीर्थस्नानें व यज्ञादि क्रिया यांनीं परमेश्वराला संतुष्ट केलें असलें पाहिजे. कारण ज्यावर चित्त गेल्यामुळें गोपस्त्रिया मोहित झाल्या त्या कृष्णाच्या अधरोष्ठाचें वारंवार प्राशन त्या स्त्रिया नित्य करतात ॥ २८ ॥

ह्याच श्रीकृष्णानें शिशुपालादि राजांना जिंकून रुक्मिणी, सत्यभामा, नाग्नजिति वगैरे आठ मुख्य नायिकांचें पराक्रमानें पाणिग्रहण केलें. तसेंच भौमासुराला मारून त्याच्या बंदिखान्यांत असणाऱ्या हजारों स्त्रियांशीं पण त्यानें विवाह लावून त्यांना द्वारकेंत आणिलें ॥ २९ ॥

कमळाप्रमाणें नेत्र असणारा असा हा श्रीकृष्ण अनेक प्रकारच्या क्रीडा करून ज्यांच्या हृदयांत पति म्हणून नेहमीं वास करतो आणि घरांतून कधींहि दूर जात नाहीं, त्या ह्या कृष्णाच्या स्त्रियांनीं खरोखर स्त्रीत्वावर जडलेला पारतंत्र्याचा व अशुद्धपणाचा डाग धुऊन काढून त्याला फारच महत्त्व आणून दिलें आहे ॥ ३० ॥

तो श्रीकृष्ण, अशा रीतीनें बोलणाऱ्या हस्तिनापुरांतील स्त्रियांचीं भाषणें ऐकून व किंचित् हास्यपूर्वक त्यांकडे पाहून त्यांच्या त्या भाषणाचें अभिनंदन करीत करीत द्वारकेला जाण्यास निघाला ॥ ३१ ॥

श्रीकृष्ण द्वारकेला जाण्यास निघाला, तेव्हां वाटेंत शत्रूकडून त्याला त्रास होईल कीं काय असें वाटून त्याच्या रक्षणाकरितां धर्मराजानें प्रेमानें चार प्रकारच्या सैन्याची योजना केली ॥ ३२ ॥

नंतर बरेच दूरपर्यंत आपल्या मागोमाग पोंचविण्यास आलेल्या व आपल्या विरहानें फारच पीडित झालेल्या अशा त्या कौरवांना मागें परतवून श्रीकृष्ण आपल्या सात्यकिप्रमुख मित्रांसह द्वारकेला गेला ॥ ३३ ॥

कुरुदेश, जांगलदेश, पांचालदेश, यमुनेच्या कांठीं असणाऱ्या देशांसह शूरसेन-देश, ब्रह्मावर्त, कुरुक्षेत्र, मत्स्यदेश आणि नंतर सारस्वतदेश ह्या सर्व देशांना ॥ ३४ ॥

आणि मारवाड प्रांताला ओलांडून, ज्याच्या रथाचे घोडे थोडेसे दमले आहेत असा तो श्रीकृष्ण, हे शौनक हो ! सौवीर व आभीर ह्या दोन देशांच्या पलीकडे असणाऱ्या द्वारकेला प्राप्त झाला ॥ ३५ ॥

खरोखर ज्या ज्या ठिकाणीं श्रीकृष्ण प्राप्त होई त्या त्या ठिकाणच्या लोकांनीं त्याची नजराणे देऊन पूजा केली. अशा रीतीनें श्रीकृष्ण संध्याकाळीं पश्चिम दिशेला असणाऱ्या द्वारकेला येऊन पोंचले व त्या वेळीं आकाशांत राहणारा सूर्य सुद्धां उदकांत प्रविष्ट झाला ॥ ३७ ॥

**दहावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ११ वा

त्या श्रीकृष्णानें सर्व समृद्धीनें युक्त अशा स्वतःच्या द्वारकानामक नगरीला प्राप्त होऊन तेथें राहणाऱ्या लोकांना आनंदित करण्याकरितांच कीं काय आपला श्रेष्ठ पांचजन्य नांवाचा शंख वाजविला ॥ १ ॥

तांबूस रंगाच्या कमळसमूहांत बसून शब्द करणाऱ्या कलहंसाचा शब्द जसा शोभतो तसाच, आंतील भाग दुधाप्रमाणें पांढरा असलेला व श्रीकृष्णाच्या आरक्तवर्ण अधरोष्ठाच्या स्पर्शानें तांबूस रंगाचा दिसणारा तो शंख, श्रीकृष्ण आपल्या हातांत धरून स्वतः मोठमोठ्यानें वाजवूं लागला असतां शोभूं लागला ॥ २ ॥

श्रीकृष्णदर्शनाविषयीं फारच उत्कंठित झालेल्या त्या सर्व लोकांनीं जेव्हां श्रीकृष्णाच्या पांचजन्य शंखाचा जगाचें भय नष्ट करणारा शब्द ऐकला, तेव्हां श्रीकृष्ण द्वारकेंत येत आहेत असें समजून द्वारकेंतील सर्व आबालवृद्ध लोक त्याला पाहण्याकरितां सामोरे गेले ॥ ३ ॥

श्रीकृष्ण द्वारकेंत आला तेव्हां तेथें त्याला पाहण्याकरितां सर्व नगरवासी लोक नजराणे घेऊन आले; पण श्रीकृष्णापुढें नजराणे घेऊन येणें म्हणजे खरोखर सूर्याला दिव्यानें ओवाळण्यासारखेंच होतें. आत्मस्वरूपांत नित्य रममाण होणाऱ्या व निरिच्छ अशा श्रीकृष्णाला आत्मप्राप्तीमुळें द्वारकेंत राहणारे सर्व लोक प्रफुल्लमुख होऊन मुलें पित्याला पाहून प्रेमानें आनंदित होत्सातीं गोड भाषण करतात, त्याप्रमाणें सद्गदित कंठानें बोलूं लागले. कारण तो सर्वांचा मित्र व रक्षणकर्ता होता ॥ ४ ॥ ५ ॥

हे स्वामिन् श्रीकृष्णा ! जे जे कोणी तुझे भक्त आत्यंतिक कल्याणाची इच्छा मनांत ठेवून ह्या तुझ्या चरणकमलाच्या ठिकाणीं प्रेम करतात, त्या भक्तांना आत्यंतिक कल्याणाची प्राप्ति होते. तुझ्या चरणकमलाला ब्रह्मदेव, सनत्कुमारादि ब्रह्मपुत्र व इन्द्रादि देव नेहमीं वन्दन करतात. इतरत्र आपली अंमलबजावणी करण्यास समर्थ अशा काळाची मात्रा ज्या तुझ्या चरणकमळाच्या ठिकाणीं चालत नाहीं, अशा तुझ्या चरणकमळांना आम्ही नेहमीं प्रेमपूर्वक नम्र झालों आहों ॥ ६ ॥

हे जगत् निर्माण करणाऱ्या श्रीकृष्णा ! तूं आमचा नेहमीं उत्कर्ष कर. तूंच आमची माता, तूंच आमचा सर्व प्रकारें मित्र, त्याचप्रमाणें तूंच आमचा स्वामी, पिता, गुरु, व श्रेष्ठ देवता आहेस; ह्याकरितां आम्ही तुझ्या सेवेनें अत्यंत धन्य झालों आहों !॥ ७ ॥

किती हो आश्चर्य वर्णन करावें ! स्वर्गांत राहणाऱ्या देवांना सुद्धां ज्या तुझ्या स्वरूपाचें दर्शन होणें दुरापास्त आहे व जें स्वरूप प्रेम व स्मित हास्य व तत्पूर्वक प्रेमभावानें भक्तांकडे पाहण्यामुळें अत्यंत शोभणाऱ्या मुखानें उल्लसित झालेलें असतें अशा

सर्वैश्वर्यसंपन्न तुझ्या स्वरूपाचें आम्हांला नेहमीं दर्शन घडतें. या कारणास्तव खरोखर आम्ही फारच धन्य, कृतकृत्य व तुझ्या सहवासानें सनाथ झालों आहों ॥ ८ ॥

हे कमलनेत्रा श्रीकृष्णा ! ज्या वेळीं आपण मित्रांच्या दर्शनाच्या लालसेनें कुरु व मधु ह्या देशांना निघून गेलां त्या वेळीं, सूर्य नसतांना काळोखांत डोळ्यांची जशी स्थिति होते त्याचप्रमाणें आम्हांला एकएक क्षण म्हणजे कोट्यवधि वर्षांप्रमाणें भासत होता ॥ ९॥

द्वारकेंत राहणाऱ्या प्रजाजनांनीं ह्याप्रमाणें श्रीकृष्णाची स्तुति करून प्रशंसा केली असतां त्या सर्व लोकांचीं भाषणें ऐकून भक्तांवर प्रेम करणाऱ्या श्रीकृष्णानें सर्वांकडे प्रेमपूर्वक अवलोकन केलें आणि त्यांच्यावर मोठे उपकार केले, अशा रीतीनें सर्व प्रजाजनांवर अनुग्रह करीत करीत श्रीकृष्ण द्वारकेंत शिरले ॥ १० ॥

श्रीकृष्णाप्रमाणें महापराक्रमी व बलाढ्य अशा मधु, भोज, दशार्ह, अर्ह, कुकुर, अन्धक व वृष्णि ह्या कुळांत जन्माला आलेल्या पुरुषांनीं त्या द्वारकेचें संरक्षण नागांनीं रक्षिलेल्या भोगवतीनगरीप्रमाणें केलें होतें ॥ ११ ॥

त्या द्वारकेंत अनेक प्रकारचीं सरोवरें आहेत. त्या सरोवरांच्या सभोंवार फळबागा, फुलबागा व बगीचे आणि तशींच क्रीडामंदिरें आहेत व त्यांच्या सभोंवार आश्रम असून यांतील पुण्यवृक्ष व वेली सतत सर्व ऋतूंतील पुष्पफलांनीं व समृद्धींनीं शोभणाऱ्या आहेत ॥ १२ ॥

श्रीकृष्ण जेव्हां द्वारकेंत शिरूं लागला तेव्हां द्वारकेच्या प्रवेशद्वारावर मंगलकारक तोरणें उभीं केलीं होतीं, तशींच प्रत्येक मंदिराच्या आणि घराच्या दरवाज्यावरहि तोरणें लाविलीं होतीं. एवढेंच नव्हे तर रस्त्यांवर सुद्धां दुतर्फा तोरणें लावून द्वारकानगरींत जागोजागीं चित्रविचित्र अबदागिरी व गुढ्या उभारून नगरांतील ऊन्ह सर्व नष्टप्राय करून टाकिलें होतें. अर्थात् जिकडे तिकडे गुढ्यादिकांची छाया पसरून सर्व नगरी शृंगारल्यासारखी दिसत होती ॥ १३ ॥

त्या द्वारकेंतील राजमार्ग, रस्ते, पेठा व अंगणीं झाडून स्वच्छ केलीं होतीं. आंतील रस्ते वगैरे चन्दनाचे सडे घालून सुगंधित केले होते. जिकडेतिकडे फळें, फुलें, अक्षता व वृक्षांचे कोमलांकुर टाकून सर्वत्र शोभा आणिली होती ॥ १४ ॥

आणखी त्या द्वारकेंतील घरांच्या प्रत्येक दरवाज्यावर दहीं, अक्षता, फळें, ऊस, पूर्णकुंभ[1], पूजासाहित्य, धूप व दीप ह्यांनीं शोभा आणिलेली होती ॥ १५ ॥

सर्वांना अत्यंत प्रिय असा श्रीकृष्ण द्वारकेंत आला हें ऐकून थोर मनाचा वसुदेव आणि अक्रूर, उग्रसेन व मोठा आश्चर्यजनक अलौकिक पराक्रम करणारा, बलराम ॥ १६ ॥

१ धान्यानें किंवा पाण्यानें भरलेल्या मातीच्या मोठ्या घागरीला पूर्णकुंभ म्हणतात. अशा रीतीनें पूर्णकुंभ जागोजागीं मंगलार्थ ठेवण्याची शास्त्रोक्तपद्धत पूर्वापार आहे.

प्रद्युम्न, चारुदेष्ण व जांबवंतीचा मुलगा सांब आनंदाच्या भरांत खाणें, पिणें, बसणें वगैरे क्रिया सोडून दिल्या व ते श्रीकृष्णाला सामोरे गेले ॥ १७ ॥

मंगलकारक पुष्पादि पदार्थांच्या सेवनानें शुभ आशीर्वाद देणारे ब्राह्मण, शंख, नगारे वगैरे मंगल वाद्यें आणि वेदघोष यांसह मोठ्या समारंभानें श्रेष्ठ हत्तीला पुढें करून श्रीकृष्णाला पाहण्याविषयीं आनंदानें प्रफुल्लित झालेले व प्रेमामुळें सामोरे जाण्यासाठीं घाई करणारे असे प्रद्युम्नादि शूर पुरुष आपापल्या रथांत बसून श्रीकृष्णाला आदरानें सामोरे गेले ॥ १८ ॥

श्रीकृष्णदर्शनाविषयीं उत्कंठित झालेल्या व चकचकीत कुंडलांनीं प्रकाशित अशा गालांमुळें ज्यांच्या मुखांवर तेज पडलें आहे अशा शेंकडों वेश्याहि आपापल्या वाहनांत बसून श्रीकृष्णाला सामोऱ्या गेल्या ॥ १९ ॥

त्या वेळीं द्वारकेंत नाटकी लोक, नाचणारे पुरुष व गंधर्व, तसेंच स्तुतिपाठ करणारे सूत, मागध वगैरे लोक दिगंत कीर्ति पसरलेल्या श्रीकृष्णाचीं आश्चर्योत्पादक चरित्रें गाऊं लागले ॥ २० ॥

मग षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा श्रीकृष्णानें आपली सेवा करणाऱ्या आणि द्वारकेंत राहणाऱ्या भाऊबंदांच्या अधिकारपरत्वें यथाशास्त्र भेटी घेऊन सगळ्या नगरवासी लोकांना त्या ठिकाणीं मान दिला ॥ २१ ॥

वयानें जे फारच वृद्ध होते अशा वसुदेवादिकांस साष्टांग नमस्कार करून साधारण वयोवृद्धांस साधा नमस्कार करून, तसेंच कित्येकांना आलिंगन देऊन तर बरोबरीच्यांना हस्तस्पर्श करून आणि योग्यतेनें कमी असणाऱ्या लोकांकडे केवळ हास्यपूर्वक पाहून, जसजसा ज्याचा अधिकार तसतशा योग्यतेप्रमाणें गुरुब्राह्मणापासून तों चांडाळापर्यंत सर्वांस त्यानें मान दिला व कित्येक लहान अधिकारी पुरुषांस योग्य वर वगैरे देऊन सर्व द्वारकेंतील आबालवृद्धांचें समाधान केलें ॥ २२ ॥

नंतर स्त्रियांसह सामोरे आलेले वडील, गुरु, ब्राह्मण, वृद्ध लोक आणि स्तुतिपाठक ह्यांनीं स्तुतिपूर्वक दिलेल्या आशीर्वादांचा स्वीकार करीत करीत श्रीकृष्ण द्वारकेंत शिरला ॥ २३ ॥

अहो शौनकऋषि हो ! जेव्हां श्रीकृष्ण द्वारकेच्या राजमार्गांतून मिरवीत मिरवीत चालूं लागला, तेव्हां त्याला मोठया प्रेमानें पाहण्याविषयीं उत्कंठित झालेल्या अशा कुलीन स्त्रिया वाड्यांच्या गच्च्यांवर चढल्या ॥ २४ ॥

द्वारकेंत राहणाऱ्या लक्ष्मीचें स्थान व म्हणूनच सर्वांगसुंदर अशा श्रीकृष्णाचें दर्शन नेहमीं घडत असे, तरी श्रीकृष्णदर्शनाविषयींची त्यांची उत्कंठा कधींहि तृप्त झाली नाहीं ॥ २५ ॥

त्या श्रीकृष्णाचें उरःस्थल हेंच लक्ष्मीचें राहण्याचें घर व त्याचें मुख म्हणजे नेत्रांच्या योगें श्रीकृष्णस्वरूप पिण्याचें भक्तांचें भांडेंच होय; त्याचे दंड हे लोकपालांचें राहण्याचें स्थान आणि त्याचे चरणकमल म्हणजे भक्तरूपी चक्रवाक पक्ष्यांचें वसतिस्थान होय ॥ २६ ॥

श्रीकृष्णाच्या मस्तकावर पांढरें छत्र व चवऱ्या धरल्या होत्या व रस्त्यांतून येतांना नागरिकांनीं त्याच्यावर पुष्पवृष्टि केली. श्रीकृष्णानें पिंगट वर्णाचें वस्त्र नेसलें असून त्याच्या गळ्यांत पायांपर्यंत लोंबणारी वनमाळा[1] होती. अशा या वस्तु व अलंकार यांच्या योगानें श्यामवर्णाचा तो श्रीकृष्ण, सूर्य, नक्षत्रें, इंद्रधनुष्य व वीज यांनीं शोभणाऱ्या श्यामवर्ण मेघाप्रमाणें शोभला ॥ २७ ॥

श्रीकृष्ण प्रथमतः मातापित्यांच्या ( वसुदेव व देवकी ह्यांच्या ) मंदिरांत गेला. श्रीकृष्ण आलेला पाहतांच त्याच्या सर्व मातांनीं त्याला आलिंगन दिलें आणि श्रीकृष्णानेंहि देवकी वगैरे सात मातांना मोठ्या आनंदानें मस्तक लववून साष्टांग नमस्कार घातला ॥ २८ ॥

प्रेमानें दूध बाहेर निघाल्यामुळें ज्यांचे स्तन भिजून गेले आहेत व ज्यांना पुत्रदर्शनानें फारच आनंद झाला आहे, अशा त्या श्रीकृष्णाच्या सात मातांनीं त्याला मांडीवर घेऊन आनंदाश्रूंनीं स्नान घातलें ॥ २९ ॥

नंतर सर्व वस्तूंनीं परिपूर्ण भरलेल्या व सर्व इच्छा तृप्त करणाऱ्या अशा आपल्या निरुपम मंदिरांत श्रीकृष्ण गेले. त्या मंदिरांत त्याच्या सोळा हजार स्त्रियांकरितां सोळा हजार महाल बांधले होते ॥ ३० ॥

पुष्कळ दिवस प्रवास करून घरीं परत आलेल्या आपल्या पतीला म्हणजे श्रीकृष्णाला दुरूनच पाहून त्या स्त्रियांच्या मनाला फारच आनंद झाला. त्या लाजेनें मुख खालीं करून नेत्रकटाक्षानें श्रीकृष्णाकडे पाहूं लागल्या आणि श्रीकृष्ण सत्वर परत यावा म्हणून चालविलेल्या आपल्या व्रतांचे साहित्य घेऊन त्या एकदम आसनावरून उठल्या व श्रीकृष्णाला सामोऱ्या गेल्या ॥ ३१ ॥

ज्याच्या अंतःकरणांतील अभिप्राय फारच खोल म्हणजे दुर्बोध आहे अशा त्या श्रीकृष्णाच्या स्त्रियांनीं आपला पति जो श्रीकृष्ण त्याला मनानें, नेत्रांनीं व शरिरांनीं आलिंगन दिलें. नंतर त्या फारच लज्जित झाल्या आणि आपल्या नेत्रांतून आनंदाश्रु खालीं पडूं नयेत म्हणून त्यांनीं त्यांचा अवरोध करण्याचा प्रयत्न केला. तरीसुद्धां ते अनावर झाल्यामुळें डोळ्यांत मावेनासे होऊन सरतेशेवटीं त्यांच्यातून स्रवूं लागलेच ॥ ३२ ॥

---

१. " **तुलसीकुन्दामन्दरपारिजातांम्बुजैस्तु या ॥ पञ्चाभिर्ग्रथिता माला वनमालेति कीर्त्यते** ॥ तुळशी; कुन्दफुलें, पारिजातक, कमळ व मांदार ह्या पांचांची तयार केलेली जी माळ तिला वनमाळा म्हणतात. " **आपादलम्बिनी माला वनमालेति गीयते** " पायांपर्यंत लोंबणाऱ्या माळेलाहि वनमाळा म्हणतात.

श्रीकृष्णाच्या स्त्रियांना त्याचा फारच सहवास झालेला होता. तो नेहमीं त्यांच्याच जवळ राहात असे. एवढेंच नव्हे तर कृष्णाशीं त्यांचा नेहमीं एकांतांत परिचयहि होत असे. तथापि त्यांना केव्हांहि श्रीकृष्णाचा कंटाळा आला नाहीं. त्यांना श्रीकृष्णाचीं चरणकमळें नित्य नवीननवीन वाटत ! एवढी चंचल लक्ष्मी, पण ती सुद्धां ज्या श्रीकृष्णाच्या चरणकमळांना सोडीत नाहीं, त्यापासून कोणती सामान्य स्त्री दूर होईल ? ।। ३३ ।।

याप्रमाणें श्रीकृष्णानें स्वतः हातांत शस्त्रसुद्धां न धरतां पृथ्वीला भारभूत व पुष्कळ सैन्यानें मदोन्मत्त झालेल्या राजांमध्यें आपापसांत कलह माजवून वायु जसा वेळू वगैरेंत परस्परांच्या घर्षणानेंच अग्नि उत्पन्न करून त्यांना दग्ध करतो, तसा त्या सर्वांचा नाश केला व अशा रीतीनें पृथ्वीचा भार दूर करून तो स्वतः शांत झाला ।। ३४ ।।

षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा त्या परमेश्वरानें आपल्या आदिमायेच्या साहाय्यानें ह्या मनुष्यलोकांत अवतार घेऊन साधारण प्राकृत मनुष्याप्रमाणें उत्तम उत्तम स्त्रियांच्या समुदायांत राहून अनेक प्रकारच्या क्रीडा केल्या ।। ३५ ।।

गंभीर अभिप्रायसूचक, निर्मळ आणि सुंदर अशा हास्यांनीं, तसेंच लज्जायुक्त कटाक्षांनीं शंकराला सुद्धां मोहित करून ज्यांनीं त्याला आपलें धनुष्य टाकून द्यावयास लाविलें, अशा त्या सुंदर मोहक श्रेष्ठ स्त्रिया श्रीकृष्णाच्या इन्द्रियांना मात्र क्षुब्ध करूं शकल्या नाहींत ।। ३६ ।।

खरोखर हे सर्व लोक ह्या सर्वसंगपरित्याग केलेल्या श्रीकृष्णाला हा आमच्याप्रमाणेंच विषयलोलुप आहे, आमच्याप्रमाणेंच व्यवहार करणारा व खरेंखोटें बोलणारा आहे आणि आमच्यासारखाच हा एक मनुष्य आहे, असें मानतात म्हणूनच त्या लोकांना कांहीं समजत नाहीं. ते मूर्ख होत ।। ३७ ।।

ईश्वरामध्यें जें विशिष्ट ऐश्वर्य आहे तें हेंच होय. आत्म्याच्या आश्रयानें राहणारी बुद्धि जशी आनंदादि गुणांनीं युक्त होत नाहीं, तसा ईश्वर हा मायेच्या ठिकाणीं राहूनहि मायाजन्य प्रपञ्चरूप गुणांनीं बांधला जात नाहीं ।। ३८ ।।

श्रीकृष्णाच्या स्त्रियांनाहि असें वाटलें कीं, हा श्रीकृष्ण बाईलबुद्धीचा व आपल्या सांगण्याप्रमाणें वागणारा विषयी आहे. त्यांना श्रीकृष्णाच्या माहात्म्याचें ज्ञान कोठून असणार ? त्या अज्ञानी होत्या. त्यामुळें श्रीकृष्णाला सर्वसाधारण मनुष्याप्रमाणें लेखूं लागल्या; कारण त्यांची बुद्धीच तितकी, यांत त्यांचा काय दोष ? ।। ३९ ।।

## अकरावा अध्याय समाप्त

# अध्याय १२ वा

शौनक म्हणतातः--सूत हो, अश्वत्थाम्याच्या तेजस्वी ब्रह्मास्त्रानें उत्तरेचा गर्भ नष्ट झाला असतांहि तो पुनः श्रीकृष्णानें पांडवांच्या वंशाची वृद्धि व्हावी एवढ्याकरितां जिवंत केला ॥ १ ॥

अत्यंत बुद्धिवान् व मोठ्या मनाचा असा जो उत्तरेचा मुलगा त्याचें जन्म कसें झालें ? त्यानें कसकशीं कृत्यें केलीं ? त्याप्रमाणें त्याचा मृत्यु कसा झाला ? व मरणानंतर तो देहत्याग करून कसा गेला ? तें सर्व आम्हांला सांगा ॥ २ ॥

आम्हांला तें ऐकण्याची फारच इच्छा झाली आहे. जर आपली तें सांगण्याची इच्छा असेल तर ज्याला शुकाचार्यानें ज्ञानोपदेश केला त्या उत्तरेच्या पुत्राचें सर्व चरित्र श्रद्धायुक्त अशा आम्हांला सांगा ॥ ३ ॥

सूत म्हणालाः--शौनक हो ! श्रीकृष्णाच्या एकनिष्ठपणें केलेल्या पादसेवेनें ज्याची सर्व विषयसेवनेची इच्छा समूळ नष्ट झाली आहे असा निरिच्छ व बापाप्रमाणें प्रजेचें उत्तम रीतीनें मनोरंजन करणारा तो धर्मराज प्रजेचें धर्मानें पालन करिता झाला ॥ ४ ॥

संपत्ति, यज्ञ, सर्व लोक, पत्नी द्रौपदी, भीमादि भाऊ, पृथ्वी, जम्बुद्वीपाचें राज्य आणि स्वर्गापर्यंत दुमदुमलेलें यश इतक्या सर्व गोष्टी युधिष्ठिराला अनुकूल होत्या ॥ ५ ॥

शौनकादि ऋषि हो ! देवांनीं सुद्धां इच्छा करावी असे विषय झाले तरी ते श्रीकृष्णावर चित्त ठेविलेल्या धर्मराजाला आनंद देतील काय ? ज्याप्रमाणें भुकेलेल्याच्या पुढें इतर पदार्थ आणून ठेवले असतां ते त्यास आवडत नाहींत, त्याप्रमाणेंच कृष्णभक्ति करणाऱ्या धर्मराजाला दुर्लभ असे सुद्धां राजविषय प्रिय वाटले नाहींत ॥ ६ ॥

हे शौनका ! तो उत्तरेचा पराक्रमी गर्भ मातेच्या उदरांत अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रानें पीडित झालेला असतांना तेथें अंगठ्याएवढ्या सूक्ष्मरूपधारी पुरुषाचें त्याला दर्शन झालें ॥ ७ ॥

त्या उत्तरेच्या गर्भस्थ बालकानें गर्भात अंगठ्याएवढें रूप धारण केलेल्या निर्मळ, सोन्याचा दैदीप्यमान मुकुट धारण करणाऱ्या, रूपवान् व नीलवर्णाच्या आणि विजेप्रमाणें चकचकीत वस्त्र नेसलेल्या ह्या श्रीकृष्णाला पाहिलें ॥ ८ ॥

त्या श्रीकृष्णानें सुंदर व लांबलचक चार हात धारण केले होते, त्याच्या कानांत चकचकीत सोन्याचीं कुंडलें होतीं, त्याचे डोळे लाल होते व हातांत त्यानें गदा घेतली

होती. तो आपल्या सभोंवार एकसारखा फिरत आहे व अग्निज्वाळेप्रमाणें तेजःपुंज गदा सभोंवार फिरवीत आहे, असें उत्तरेच्या गर्भस्थ बालकानें अवलोकन केलें ॥ ९ ॥

ज्याप्रमाणें सूर्य धुक्याला पार नाहींसें करून टाकतो, त्याप्रमाणें हातांत तेजस्वी गदा घेऊन अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्राचें मूळ नाश करणाऱ्या श्रीकृष्णाला जवळच पाहून हा कोण असावा असा उत्तरेचा गर्भस्थ बालक आपल्याशीं विचार करूं लागला ॥१०॥

ज्याच्या स्वरूपाचें वर्णन करतां येणार नाहीं व जो नेहमीं धर्माचें रक्षण करण्यास तत्पर आहे, असा सर्वव्यापी श्रीकृष्ण दहा महिने गर्भांत राहिलेल्या त्या उत्तरेच्या गर्भस्थ बालकाच्या समक्ष अश्वत्थाम्यानें सोडलेल्या ब्रह्मास्त्राचा विध्वंस करून तेथेंच गुप्त झाला ॥ ११ ॥

नंतर पंडुराजाच्या वंशाला धारण करणारा व पराक्रमानें दुसरा पंडुराजाच पुनः उत्पन्न झाला कीं काय असें भासविणारा, सर्व गुणांनीं परिपूर्ण असा तो बालक सर्वग्रह अनुकूल असतां शुभ मुहूर्तावर जन्मास आला ॥ १२ ॥

उत्तरेला मुलगा झालेला पाहून धर्मराजाला मोठा आनंद झाला. त्यानें धौम्य, कृप वगैरे ब्राह्मणांकडून पुण्याहवाचनादि मंगल कृत्यें करवून त्यांच्याकडून शुभ आशीर्वाद घेतले आणि त्या मुलाचें जातक वर्तविलें ॥ १३ ॥

संपूर्ण तीर्थांना व उत्सवांना जाणाऱ्या त्या धर्मराजानें आपल्या वंशाला वाढविणारा असा उत्तरेला मुलगा झालेला पाहून मोठा पुत्रजन्मोत्सव साजरा केला व विद्वान् ब्राह्मणांना बोलावून त्यांस सोनें, गाई, पृथ्वी, गांवें, तसेंच उत्तमोत्तम हत्ती व घोडे आणि मिष्टान्न यथेष्ट अर्पण केलें ॥ १४ ॥

धर्मराजानें जेव्हां पुत्रोत्सवाबद्दल आनंदित होऊन ब्राह्मणांना पुष्कळ दानधर्म केला त्या वेळीं सर्व ब्राह्मणांना फारच आनंद झाला. नम्रपणानें वागणाऱ्या त्या धर्मराजाला ते ब्राह्मण म्हणाले, ‘ हे पुरुकुलांत श्रेष्ठपद पावलेल्या धर्मराजा ! हा उत्तरेचा मुलगा पुरुवंशाला कुलदीपक असाच उत्पन्न झालेला आहे ’ ॥ १५ ॥

हा उत्तरेचा मुलगा म्हणजे निष्पाप अशा पुरुवंशाचा अंकुरच होय. असा हा पुरुवंशांकुर अनिवार्य दैवानें ब्रह्मास्त्राच्या योगें नष्टप्राय झाला असतां महापराक्रमी अशा परमेश्वरानें तुमच्यावर उपकार करण्यासाठीं म्हणजे पुरुकुळाचा उच्छेद होऊं नये म्हणून या मुलाचें ब्रह्मास्त्रापासून रक्षण केलें ॥ १६ ॥

त्यामुळें ह्या उत्तरेच्या मुलाला विष्णुरात[1] असें नांव प्राप्त होईल; व हा विष्णुरात नांवानें जगांत मोठी कीर्ति मिळवील. हा मोठा भगवद्भक्त अर्थात् वैष्णवांत श्रेष्ठ असा होईल ह्यांत संशय नाहीं ॥ १७ ॥

---

१ “ विष्णुना ” म्हणजे श्रीकृष्णानें “ रातः ” रक्षिलेला; म्हणून ह्याचें नांव “ विष्णुरात ” असें ठेविलें.

धर्मराज म्हणतात—अहो साधुश्रेष्ठ ब्राह्मण हो ! हा उत्तरेचा मुलगा विष्णुरात सज्जन पुरुषांनीं वर्णन करण्याजोग्या कीर्तीनें सर्वत्र लौकिक मिळवून व उत्तम कीर्ति मिळविलेल्या, थोर मनाच्या पूर्वज राजर्षींच्याप्रमाणें पराक्रमाचीं कृत्यें करून त्यांच्या सन्मार्गाचें अनुकरण करील काय ? ॥ १८ ॥

हे धर्मराजा ! हा विष्णुरात स्वायंभुव मनूपासून उत्पन्न झालेल्या इक्ष्वाकुराजाप्रमाणें प्रजेचें पालन करील आणि दशरथाचा मुलगा जो रामचंद्र त्याप्रमाणें हा खरें बोलणारा व ब्राह्मणांचे कल्याण करणारा होईल ! ॥ १९ ॥

हा उत्तरेचा मुलगा विष्णुरात, उशीनर राजाचा मुलगा जो शिबिराजा त्याप्रमाणें दानधर्म करणारा व शरण आलेल्या लोकांचें रक्षण करणारा होईल. त्याचप्रमाणें हा दुष्यंत राजाचा मुलगा जो भरत त्याप्रमाणें यज्ञयागादि कृत्यें करणाऱ्या पूर्वजांच्या कीर्तीला पसरविणारा होईल ॥ २० ॥

हा विष्णुरात धनुर्धारी वीर पुरुषांमध्यें श्रेष्ठ होईल आणि त्याचप्रमाणें सहस्रार्जुन व पंडुपुत्र अर्जुन ह्या दोन्ही अर्जुनांप्रमाणें पराक्रमी होईल. ज्याप्रमाणें कोणीहि पुरुष अग्नीला सहन करू शकत नाहीं, त्याप्रमाणेंच कोणीहि वीर याला जिंकू शकणार नाहीं; तसेंच ज्याप्रमाणें समुद्राचें उल्लंघन करणें कठीण त्याचप्रमाणें ह्याच्या आज्ञा उल्लंघन करणें कठीण होईल ॥ २१ ॥

हा विष्णुरात सिंहाप्रमाणें पराक्रमी होईल. ज्याप्रमाणें सर्व लोक हिमालय पर्वताचा सहवास करण्यास इच्छितात त्याचप्रमाणें सर्व लोक ह्याची सेवा करतील. हा पृथ्वीप्रमाणें सहनशील होईल. ज्याप्रमाणें मुलांचे सर्व अपराध त्यांचे आईबाप सहन करतात त्याप्रमाणें हा प्रजेचे अपराध सहन करील ॥ २२ ॥

ज्याप्रमाणें ब्रह्मदेव किंवा आजोबा धर्मराज हे सर्वत्र समबुद्धीनें वागणारे आहेत त्याचप्रमाणें हा होईल. शंकराप्रमाणें हा सर्वांवर प्रसाद करील. ज्याप्रमाणें विष्णूनें लक्ष्मीला आश्रय दिला आहे त्याप्रमाणें हा सर्व प्राणिमात्रांस आश्रय देईल ॥ २३ ॥

हा विष्णुरात सद्गुणांच्या बाबतींत श्रीकृष्णाप्रमाणें सर्वगुणसंपन्न होईल व सर्वप्रकारें श्रीकृष्णाचें अनुकरण करील. रन्तिदेवाप्रमाणें हा उदार मनाचा होईल व ययाति राजाप्रमाणें धर्मशील होईल ॥ २४ ॥

हा विष्णुरात बलिराजाप्रमाणें मोठा धैर्यवान् होईल. ज्याप्रमाणें प्रह्लादाची परमेश्वरावर नैष्ठिक भक्ति होती त्याचप्रमाणें हा श्रीकृष्णावर फारच प्रेम करील; हा पुष्कळ अश्वमेध यज्ञ करील; त्याचप्रमाणें हा वृद्ध व ज्ञानी पुरुषांची सेवा करील ॥ २५ ॥

ह्याच्या वंशांत उत्पन्न झालेले पुरुष राजर्षिपणाला प्राप्त होतील. दुष्ट मार्गाचा अवलंब करणाऱ्या दुर्जनांना हा शासन करून सर्वांना सन्मार्गाला लावील. पृथ्वीच्या व धर्माच्या रक्षणाकरितां दुष्ट जो कलि त्याचा हा निग्रह करील ॥ २६ ॥

ब्राह्मणाच्या मुलानें पाठविलेल्या तक्षक नांवाच्या नागापासून आपला मृत्यु आहे असें ऐकून हा तात्काल राजोपभोगाबद्दलची आसक्ति सोडून अर्थात् सर्वसंगपरित्याग करून विष्णुपदाला म्हणजे वैकुंठलोकाला जाईल ॥ २७ ॥

हे धर्मराजा ! व्यासपुत्र जे शुकाचार्य त्यांच्यापासून हा विष्णुरात आत्मविषयक यथार्थ ज्ञान प्राप्त करून घेऊन हें शरीर गंगेंत सोडून खरोखर निर्भय अशा मोक्षपदाला जाईल ॥ २८ ॥

जातक वर्तविण्यांत कुशल अशा सर्व विद्वान् ब्राह्मणांनीं याप्रमाणें धर्मराजाला सांगून व त्याच्याकडून पूजादि सत्कारांचा स्वीकार करून ते सर्व आपापल्या घरीं परत निघून गेले ॥ २९ ॥

समर्थ असा हा विष्णुरात पूर्वी गर्भामध्यें पाहिलेल्या पुरुषाला चिंतून तो ह्या ठिकाणीं बसलेल्या मनुष्यांत आहे कीं काय, म्हणून इकडेतिकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहूं लागेल व त्यामुळें ह्याचें नांव परीक्षित्[1] असें सर्वत्र होईल ॥ ३० ॥

तो राजपुत्र परीक्षित्, ज्याप्रमाणें शुक्लपक्षांत चंद्र सर्व कलांनीं युक्त होऊन दररोज वाढत जातो, त्याप्रमाणें धर्मराजादि वडिलांनीं पालनपोषण केलेला असा नित्य वाढत चालला ॥ ३१ ॥

आपण आतांपर्यंत भीष्मद्रोणादि वडील मंडळींशीं, तसेंच दुर्योधनादि भाऊबंदांशीं वैर करून त्यांना ठार मारिलें हा मोठाच दोष केला; त्या दोषाचा परिहार करण्याच्या इच्छेनें अश्वमेध यज्ञ करण्याची युधिष्ठिराच्या मनांत इच्छा उत्पन्न झाली. परंतु यज्ञाला लागणारें पुरेसें द्रव्य त्याच्याजवळ नव्हतें व प्रजेवर अधिक कर किंवा दंड लादून द्रव्य गोळा करण्याची त्याची इच्छा नव्हती. तेव्हां या दोन गोष्टींशिवाय कोणत्या सद्धर्माच्या मार्गानें आपणांस यज्ञाकरितां द्रव्य संपादन करतां येईल अशाबद्दल तो धर्मराज मनांत विचार करूं लागला ॥ ३२ ॥

धर्मराजाच्या मनांत यज्ञ करण्याबद्दलचा विचार आलेला आहे हें पाहून भीमादि चार बंधु श्रीकृष्णाच्या आज्ञेवरून, उत्तर दिशेला जें पुष्कळ द्रव्य पुरून ठेविलें होतें तें सर्व तेथून घेऊन आले ॥ ३३ ॥

---

१ परि म्हणजे सभोंवतीं, ईक्ष म्हणजे पाहणें; यावरून परीक्षित् म्हणजे विचारपूर्वक निरीक्षण करणारा.

ज्ञातिवधामुळें भेदरून गेलेला यमधर्माचा पुत्र जो धर्मराज त्यानें, भीमादि भावांनीं उत्तर दिशेहून आणलेल्या पुष्कळ द्रव्यानें सर्व यज्ञसामग्री सिद्ध केली आणि तीन अश्वमेध यज्ञ करून त्यांत श्रीविष्णूची पूजा केली ।। ३४ ।।

यज्ञ करण्याकरितां धर्मराजानें श्रीकृष्णाला बोलाविलें असतां श्रीकृष्णानें येऊन ब्राह्मणांकडून धर्मराजाचा यज्ञ करविला आणि मित्राचें प्रिय संपादन करण्याकरितां तेथें हस्तिनापुरांतच तो कांहीं महिने राहिला ।। ३५ ।।

अहो शौनक हो ! नंतर द्रौपदी व भीमादि बंधु यांसह धर्मराजानें संमती दिली असतां यादवांसह श्रीकृष्ण अर्जुनाला बरोबर घेऊन द्वारकेला जाण्यास निघाला ।। ३६ ।।

**बारावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १३ वा

सूता म्हणतात,शौनकहो ! जेव्हां कौरवपांडवांचें युद्ध चालू होतें तेव्हां विदुर तीर्थयात्रा करण्याकरितां गेला होता. त्या तीर्थयात्राप्रसंगीं विदुराला मैत्रेयाचें दर्शन झालें व मैत्रेयानें त्याला आत्मज्ञानाचाउपदेश केला. त्यामुळें विदुराला आपण कृतकृत्य झालों असें वाटून सर्व ज्ञानविषयक इच्छा तृप्त झालेला असा तो मोठया आनंदानें हस्तिनापुराला परत आला ॥ १ ॥

विदुरानें मैत्रेयाजवळ जाऊन त्याला जेवढे प्रश्न विचारले होते, तेवढ्यांचीं उत्तरें मिळण्यापूर्वींच विदुराची श्रीकृष्णावर इतकी भक्ति दृढ झाली कीं, त्यामुळें तो विदुर सर्वज्ञ होऊन पुढील प्रश्नांचीं उत्तरें न ऐकतांच तृप्त झाला ॥ २ ॥

आपल्याला बंधूप्रमाणें प्रसंगविशेषीं साहाय्य करणारा तो विदुर पुष्कळ दिवसांनीं हस्तिनापुरांत आला आहे असें पाहून भीमादिक चार भावांसह धर्मराज, धृतराष्ट्र, सात्यकि, संजय, कृपाचार्य आणि कुंती—॥ ३ ॥

अहो शौनक हो ! गांधारी, द्रौपदी, सुभद्रा, उत्तरा, कृपी आणि तशाच दुसऱ्या नातेवाइकांच्या स्त्रिया व पांडूच्या कुळांतील स्त्रिया पुत्रांसह—॥ ४ ॥

मृत झालेल्या शरीरांत नवीन येणारा प्राणच कीं काय, अशा रीतीनें प्राप्त झालेल्या त्या विदुराला मोठया आनंदानें सामोऱ्या गेल्या व सर्वांनीं अधिकारपरत्वें त्याला आलिंगन देऊन व नमस्कार करून त्याची भेट घेतली ॥ ५ ॥

पुष्कळ दिवस वियोग झाल्यामुळें ज्याला पाहण्यासाठीं तेथील लोक फारच उत्कंठित होऊन विव्हळ झाले होते, त्या विदुराला पाहतांच त्यांच्या डोळ्यांतून सारखे प्रेमाश्रूंचे प्रवाह वाहूं लागले. नंतर धर्मराजानें विदुराला आसनावर बसवून त्याची पूजा केली ॥ ६ ॥

धर्मराजानें विदुराला प्रथम भोजन वगैरे दिलें. नंतर बराच वेळ विसावा घेतल्यावर त्याला सुखानें आसनावर बसवून सर्व मंडळींच्या समक्ष आदरपूर्वक नम्र होऊन त्या विदुराजवळ तो बोलूं लागला ॥ ७ ॥

धर्मराज म्हणतातः—हे विदुरा ! आपण आईसह आम्हांला पूर्वीं विषापासून तसेंच अग्नीपासून व त्याचप्रमाणें दुसऱ्याहि अनेक विपत्तींतून रक्षिलें. आम्ही आपल्या पंखांच्या छायेखालींच लहानाचे मोठे झालों आहों. आमचें आपणांस स्मरण होतें काय ? ॥ ८ ॥

---

१ हा विदुरमैत्रेयसंवाद श्रीमद्भागवताच्या तिसऱ्या व चौथ्या स्कंधांत दिलेला आहे.

पृथ्वीवर फिरत असतां आपण कोणकोणत्या मार्गानें स्वतःचें उपजीवन केलेंत ? तसेंच आपण पृथ्वीवर कोणकोणत्या मुख्य मुख्य क्षेत्रांचें व तीर्थांचें सेवन केलेंत ? ॥९॥

हे विदुरा ! तुमच्यासारखे स्वतः पवित्र असे भगवद्भक्त आपल्या हृदयांतच श्रीविष्णूचें वास्तव्य असल्यामुळें तीर्थक्षेत्रांना पावित्र्य आणून देतात ॥ १० ॥

बाबा विदुरा ! आमचे मित्र, आमचे बंधुवर्ग, तसेंच श्रीकृष्णाला देव मानणारे यादव, ह्यांचें दर्शन तुम्हांला घडलें काय ? किंवा ह्या सर्व मंडळींबद्दल तुम्हीं कांहीं ऐकलें काय ? हे सर्व द्वारकेंत खुशाल आहेत ना ? ॥ ११ ॥

धर्मराजानें याप्रमाणें विदुराला विचारिलें असतां यादववंशाचा नाश झाल्याबद्दलची तेवढी गोष्ट वगळून ज्या ज्या कांहीं गोष्टी विदुरानें अनुभविल्या किंवा पाहिल्या होत्या त्या सर्व त्यानें अनुक्रमानें वर्णन करून सांगितल्या ॥ १२ ॥

यदुवंशाच्या नाशाची बातमी सांगितल्यास धर्मादिकांस दुःख होईल, तेव्हां यांचें दुःख पाहण्याचा प्रसंग आपणावर येऊं नये म्हणून, ही दुःखद अशी गोष्ट सांगण्याचा प्रसंग प्राप्त झाला होता, तरी सुद्धां दयाळु अंतःकरणाच्या विदुरानें ती त्यांना स्वतः सांगितली नाहीं ॥ १३ ॥

नंतर धर्मानें विदुराचा देवाप्रमाणें सत्कार केला आणि विदुरहि वडील भाऊ जो धृतराष्ट्र त्याला कल्याणाच्या मार्गाचा उपदेश करीत सर्वांची प्रीति संपादन करून कांहीं काळपर्यंत तेथें आनंदानें राहिला ॥ १४ ॥

मांडव्य ऋषीच्या शापामुळें यमधर्माला शंभर वर्षेपर्यंत शूद्रयोनींत जन्म घ्यावा लागला व तेवढा काळ यमधर्माचें पापी लोकांना शिक्षा देण्याचें कार्य सूर्यानें केलें ॥१५॥

राज्यप्राप्ति होऊन कुरुवंशाची वाढ करणारा नातूहि पण धर्माला झाला. अशा स्थितींत त्या नातवाला पाहून आणि प्राप्त झालेल्या अलौकिक अशा राज्यश्रीचा विचार मनांत येऊन युधिष्ठिर इंद्रादि लोकपालाप्रमाणें तेजस्वी अशा आपल्या भावांसह पराकाष्ठेचा आनंदित झाला ॥ १६ ॥

ह्याप्रमाणें गृहस्थाश्रमाच्या वैषयिक सुखांत निमग्न असणाऱ्या आणि त्याच विषयांच्या इच्छेनें मदोन्मत्त झालेल्या त्यांचा म्हणजे धर्मादिकांचा अत्यंत अपरिहार्य असा काळ केव्हांच निघून गेला ॥ १७ ॥

विदुरानें ती एकंदर परिस्थिती ओळखून धृतराष्ट्राला म्हटलें, हे धृतराष्ट्रा ! तूं आतां येथें राहणें प्रशस्त नाहीं; लवकरच येथून बाहेर जा. लवकरच येत असलेल्या ह्या भयाकडे जरा दृष्टि फेंका ॥ १८ ॥

हे राजा धृतराष्ट्रा ! ज्याचा केव्हांहि प्रतिकार होऊं शकत नाहीं, तो सर्वगुणसंपन्न असा आपल्या सर्वांचा काल सांप्रत आला आहे ॥ १९ ॥

कालाच्या तावडींत सांपडून हे सर्व प्राणी अत्यंत प्रिय अशा प्राणालाहि टाकून देऊन तत्काळ नाश पावतात; तर मग इतर द्रव्यादि पदार्थ नाश पावतील हें काय सांगावयास पाहिजे ? ॥ २० ॥

हे धृतराष्ट्रा ! युद्धांत तुझे भीष्मादि पितर, तसेच भाऊ, मित्र व दुर्योधनादि मुलगे मृत झाले, तुझें तारुण्य जाऊन तुला म्हातारपण प्राप्त झालें; आणि तुझें शरीरहि जरेनें ग्रासून गेलें; तरीपण अशा स्थितींतहि तूं दुसऱ्याच्या घरांत राहून आपली उपजीविका करावीस काय ? ॥ २१ ॥

हे धृतराष्ट्रा ! प्रत्येक प्राणिमात्रास आपण पुष्कळ वर्षें जगावें; अशी किती तरी प्रबल इच्छा असते; पहा तूं सुद्धां तशीच इच्छा मनांत धरून भीमानें दिलेल्या अन्नाच्या गोळ्याचा कुत्र्याप्रमाणेंच स्वीकार करीत आहेस ! ॥ २२ ॥

ज्यांना अग्नि लावून तूं मारण्याचा प्रयत्न केलास व विष घातलेंस, ज्यांच्या पत्नीचा अपमान केलास आणि राज्याचा अपहार केलास, तसेंच त्यांचें द्रव्यहि तूं लुबाडलेंस, त्यांनी दिलेल्या अन्नानें प्राणरक्षण करण्यात काय अर्थ आहे ? ॥ २३ ॥

हे धृतराष्ट्रा ! अशा शोचनीय स्थितींतहि जगावें असें वाटणारा तुझा देह जुन्या वस्त्रांप्रमाणें इच्छा नसतांहि वृद्धावस्थेमुळें क्षीण होत चालला आहे ॥ २४ ॥

जो विषयांचा त्याग करून कामक्रोधादिकांनीं उत्पन्न होणाऱ्या सांसारिक बंधना-पासून मुक्त होतो, ज्याचे मार्ग अज्ञानी लोकांना कळत नाहींत, व जो स्वार्थाचा त्याग करून ह्या देहाला सोडून देतो, तोच पुरुष खरोखर शहाणा होय असें शास्त्रांत सांगितलें आहे ॥ २५ ॥

ह्या जगतीतलावर जो स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या उपदेशावरून वैराग्यसंपन्न बनतो आणि आत्मज्ञानी होऊन ईश्वराला हृदयांत सांठवून अरण्याचा आश्रय करितो तोच खरा श्रेष्ठ पुरुष होय ॥ २६ ॥

हे धृतराष्ट्रा ! आतां आपण आपल्या बांधवांना न कळेल अशा रीतीनें उत्तर दिशेला निघून जावें. ह्यापुढें येणारा काळ पुरुषांच्या गुणांचा ऱ्हास करणाराच असेल ॥ २७ ॥

ह्याप्रमाणें धाकटा भाऊ जो विदुर त्यानें धृतराष्ट्राला पुष्कळ उपदेशाच्या गोष्टी सांगितल्यानंतर भावानें दाखविलेल्या मार्गानें अजमीढ कुळांत जन्मलेला आंधळा राजा धृतराष्ट्र आतेष्टसंबंधी बांधवांवरील असलेल्या अति बळकट प्रेमपाशाला तोडून टाकून एकदम घरांतून बाहेर पडला ॥ २८ ॥

तेव्हां सदाचारसंपन्न महापतिव्रता गांधारी, सुद्धां, ज्याप्रमाणें धर्मविषयक वाद-विवाद सज्जनांना फार प्रिय होतो त्याप्रमाणें संन्यासी व साधु पुरुष ह्यांना आनंद देणाऱ्या हिमालय पर्वताकडे धृतराष्ट्र जात आहे, असें समजून त्याच्या मागोमाग गेली ॥ २९ ॥

दुसरे दिवशीं युधिष्ठिरानें सूर्योपासना उरकून अग्नीला पूजनपूर्वक हविर्भाग दिले आणि ब्राह्मणांना तीळ, गाई, पृथ्वी व सुवर्ण यांचें दान केलें. नंतर वडिलांना नमस्कार करण्याकरितां तो धृतराष्ट्राच्या घरीं गेला; तों तेथें विदुर धृतराष्ट्र व गांधारी हीं तीन्हीहि त्यास दिसलीं नाहींत ॥ ३० ॥

जेव्हां धर्मराजाला तेथें धृतराष्ट्रादिक दिसले नाहींत तेव्हां त्यास फारच दुःख झालें. त्यानें तेथें बसलेल्या संजयाला विचारलें कीं, हे संजया ! म्हातारा व आंधळा असा आमचा बाबा धृतराष्ट्र कोठें आहे ? ॥ १ ॥

पुत्रवधामुळें दुःखित झालेली आई गांधारी कोठें गेली ? तसेंच चांगल्या अंतःकरणाचा विदुरहि कोठें गेला ? भाऊबंद मारल्यामुळें अल्पबुद्धीच्या माझ्याविषयीं मनांत कांहीं पापविषयक शंका आणून दुःख करीत त्यानें गांधारीसह गंगेंत देहत्याग तर नाहीं ना केला ? ॥ ३२ ॥

आमचा पिता पंडु निवर्तल्यावर प्रियबंधूचे जे पुत्र आम्ही त्या आम्हां सर्वांचें ज्यांनीं संकटांपासून रक्षण केलें तो आमचा काका धृतराष्ट्र आणि काकू गांधारी हीं येथून गेलीं तरी कोठें ? ॥ ३३ ॥

सूत म्हणतात—ऋषि हो ! धृतराष्ट्राच्या वियोगानें संजयलाहि फारच दुःख झालें. तो आपला धनी धृतराष्ट्र कोठेंच दिसत नाहीं असें पाहून दयेनें व प्रेमानें व्याकुळ झाला व त्या तळमळीमुळें त्याला धर्माच्या प्रश्नाला उत्तरहि देववेना ॥ ३४ ॥

नंतर संजयानें आपल्या दोन्ही हातांनीं स्वतःचे अश्रू पुसून डोळे साफ केले, स्वतः मनाला किञ्चित् धीर दिला आणि मग आपला धनी जो धृतराष्ट्र त्याच्या पादकमलांचें स्मरण करून धर्मराजाला उत्तर देण्यास प्रारंभ केला ॥ ३५ ॥

संजय म्हणालाः—हे कुरुकुलश्रेष्ठा धर्मराजा ! तुमच्या वडिलांच्या म्हणजे धृतराष्ट्र व विदुर ह्यांच्या तसेंच गांधारीच्या मनांतील अभिप्राय मला कांहीं एक समजलेला नाहीं. हे आजानुबाहु धर्मराजा ! थोर मनाच्या ह्या तिघांनींहि मला खरोखर चांगलेंच फसविलें आहे ॥ ३६ ॥

संजय धर्मराजाला इतकें सांगत आहे तों तुम्बुरूसह नारदऋषि धर्मराजाजवळ आले. धर्मराजानें त्याला सामोरें जाऊन नमस्कार केला व त्याचें पूजन करून विचारलें ॥ ३७ ॥

धर्मराज म्हणतातः— हे सर्वैश्वर्यसंपन्न नारदा ! वडील धृतराष्ट्र व विदुर हे कोठें गेले ? तसेंच पुत्रवधामुळें दुःखित झालेली पुण्यशील माता गांधारी कोठें गेली, हें मला कांहींच समजत नाहीं. हे भगवन्, आपणच नावाड्याप्रमाणें या अफाट दुःखसमुद्रांतून आम्हांला पार नेणारे नावाडी आहां ॥ ३८ ॥

नंतर ऋषिश्रेष्ठ व सर्वैश्वर्यसंपन्न नारद धर्मराजाला बोलले :—हे धर्मराजा ! तूं कोणाबद्दलसुद्धां मुळींच शोक करूं नकोस; कारण सर्व जग परमेश्वराच्या स्वाधीन आहे ॥ ३९ ॥

हे सर्व लोकपालांसह लोक ज्या परमेश्वराची बलिदानादिकांनीं पूजा करतात तोच परमेश्वर सर्व प्राण्यांना उत्पन्न करून त्यांचा संयोग करतो व पुनः वियोगहि तोच करतो ॥ ४० ॥

ज्याप्रमाणें नाकांत वेसण घातलेला बैल प्रत्येकीं दाव्यानें दावणींत बांधलेले असतात त्याप्रमाणें वेदरूपी दावणींत अनेक प्रकारच्या नामरूपादि दाव्यांनीं बांधलेले हे हे लोक आपला धनी जो परमेश्वर त्याला बलि अर्पण करतात ॥ ४१ ॥

ज्याप्रमाणें खेळणारा पुरुष आपल्या इच्छेनें खेळण्याचें सामान खेळण्याच्या वेळीं जवळ घेतो व खेळ संपतांच सर्व आवरून ठेवतो, त्याप्रमाणेंच परमेश्वर हा मनुष्यांचा संयोग व वियोग करतो ॥ ४२ ॥

हें जग अविनाशी म्हणा, क्षणिक म्हणा कीं अविनाशीहि नव्हे व क्षणिकहि नव्हे असें म्हणा, कोणताहि पक्ष घेतला तरी धृतराष्ट्र, गांधारी व विदुर ह्यांच्या वियोगाबद्दल शोक करीत बसणें अयोग्य होय. तसें करण्याला अज्ञानजन्य प्रेमाशिवाय दुसरें कांहींच कारण नाहीं ॥ ४३ ॥

हे धर्मराजा ! ह्याकरितां तू अज्ञानापासून उत्पन्न झालेलें धृतराष्ट्रादिकांच्याविषयींचें आपलें दुःख सोडून दे व दीन झालेलीं तीं माणसें माझ्याशिवाय कशीं जगतील हा विचार तू मनांत आणू नकोस ॥ ४४ ॥

पञ्चमहाभूतांपासून बनलेला हा देह काल, कर्म व गुण ह्यांच्या आधीन आहे. सर्पानें गिळलेला पुरुष जसें दुसऱ्यांचें रक्षण करूं शकत नाहीं तसा ह्यांच्या आधीन असणारा पुरुष तरी दुसऱ्यांचें कसें रक्षण करील ? ॥ ४५ ॥

ज्यांना हात नाहींत असे प्राणी हात असणाऱ्यांचें उपजीविकासाधन होत. तसेंच ज्यांना पाय नाहींत असे पदार्थ म्हणजे गवत वगैरे चार पाय असणाऱ्या पशूंचें उपजीविकासाधन होत. तात्पर्य, लहान व निर्बळ पदार्थ किंवा प्राणी सबळ व मोठ्या प्राण्यांचें उपजीविकासाधन आहेत. म्हणजे एकंदरींत जीवांच्या उपजीविकेचें साधन जीवच होत ॥ ४६ ॥

हे धर्मराजा ! हें सर्व जग प्राणिमात्रांच्या ठिकाणीं व्यापून राहणाऱ्या परमेश्वराचेंच रूप आहे. ज्ञानी, सर्वैश्वर्यसंपन्न परमेश्वर आंतबाहेर एकस्वरूपानें राहणारा असूनहि मायेनें अनेक स्वरूपें धारण केल्याप्रमाणें भासतो. त्या परमेश्वराकडे पाहा ! ॥ ४७ ॥

हे धर्मराजा ! सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ति व रक्षण करणारा सर्वैश्वर्यसंपन्न काळस्वरूपी तो हा परमेश्वरच आज दैत्यांचा नाश करण्याकरितां अवतरला आहे ॥ ४८ ॥

श्रीकृष्णानें दैत्यांचा नाश करण्याचें देवकार्य बहुतेक संपविलें आहे. जें थोडेंसें उरलें आहे तें केव्हां संपेल त्याची तो वाट पाहात आहे. जोंपर्यंत तो येथें आहे तोंपर्यंतच तुम्ही देखील वाट पाहा ! ॥ ४९ ॥

भाऊ विदुर व पत्नी गांधारी ह्यांच्यासह धृतराष्ट्र हिमालय पर्वताच्या दक्षिण बाजूच्या रस्त्यानें पुढें असणाऱ्या ऋषींच्या आश्रमाला गेला ॥ ५० ॥

ती आकाशगंगा खरोखर सप्तर्षींना संतुष्ट करण्याकरितां विविध अशा सात प्रवाहांनीं वाहूं लागली; म्हणून तिला सप्तस्रोत असें म्हणतात ॥ ५१ ॥

शांत अंतःकरणाचा आणि निरिच्छ झालेला तो धृतराष्ट्र सकाळसंध्याकाळ त्या सप्तस्रोत नदींत स्नान करून आणि यथाविधि अग्निपूजनादि करून केवळ पाण्यावर राहिला आहे ॥ ५२ ॥

त्यानें आसनविधि साध्य करून घेऊन प्राणायामादि विधीनें सर्व इन्द्रियें आवरून घेतलीं आहेत आणि परमेश्वरावरील पूर्ण भक्तियोगामुळें सत्त्वरजतमात्मक त्रिगुणांचा पार नायनाट करून सोडला आहे ॥ ५३ ॥

त्यानें स्वतःच्या अन्तःकरणाला बुद्धीमध्यें, बुद्धीला जीवात्म्यांत आणि जीवात्म्याला जगाला आधारमूत अशा ब्रह्मांत, घटांतील आकाशाला मुख्य आकाशांत लीन केल्याप्रमाणें लीन केलें आहे ॥ ५४ ॥

त्यानें मायेचे सत्त्व, रज व तम हे जे तीन गुण व त्यांचीं जीं लोभमोहादि फलें तीं टाकून देऊन इंद्रियांच्या विषयांकडे जाणाऱ्या प्रवाहांचा रोध केला आहे व भक्ष्यभोज्यादि सर्व आहारांचा त्याग करून स्तंभाप्रमाणें तो निश्चल राहिला आहे ॥ ५५ ॥

हे धर्मराजा ! सर्व कर्मांचा त्याग केलेल्या त्या धृतराष्ट्राच्या सत्कृत्यांत तूं विघ्न उत्पन्न करूं नकोस. आजपासून पांचव्या दिवशीं स्वतःच्या शरिराचा तो त्याग करील व तें त्याचें शरीर भस्म होईल ॥ ५६ ॥

आश्रमासह आपल्या पतीचा देह अग्नीनें जळून भस्म होत असतां आश्रमाच्या बाहेर उभी असलेली धृतराष्ट्रपत्नी पतिव्रता गांधारी पतीला अनुसरून अग्नींत प्रवेश करील ! ॥ ५७ ॥

हे धर्मराजा ! विदुर तर तें आश्चर्यकारक कृत्य पाहून एकीकडून आनंदित व एकीकडून दुःखित होईल आणि तीर्थांचें सेवन करण्याच्या हेतूनें तेथून निघून जाईल ! ॥ ५८ ॥

असा हा वृत्तांत धर्मराजाला सांगून तुंबुरूसह नारद स्वर्गाला निघून गेला असतां धर्मराजानें त्याचें भाषण आपल्या मनांत ठसवून सर्व शोक सोडून दिला ॥ ५९ ॥

## तेरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १४ वा

सूत म्हणतातः-शौनका ! आपल्या बांधवांची भेट घ्यावी आणि पुण्यश्लोक श्रीकृष्णाचें चरित्रहि पाहावें या हेतूनें अर्जुन द्वारकेला गेला असतां—|| १ ||

कित्येक महिने होऊन गेले, तरी देखील तेथून अर्जुन परत आला नाहीं; तेव्हां कुरुश्रेष्ठ युधिष्ठिराला भयंकर चिन्हें दिसूं लागलीं || २ ||

ऋतूंचे धर्म विपरीत झाले; काळाचें स्वरूप भयंकर झालें, माणसें रागीट, लोभी, असत्य भाषण करणारीं व पापी वर्तनाचीं झालीं; त्यांचे व्यवहार कपटी झाले; मित्र मित्रांना फसवूं लागले; आईबाप, स्नेहीस्नेही, भाऊभाऊ, पतिपत्नी यांत कलह चालू झाले. अशा रीतीनें काळ चालला असतां हीं अनिष्ट चिन्हें आणि माणसांत उत्पन्न होणाऱ्या लोभआदिकरून पापप्रवृत्ति पाहून धर्मराज आपला कनिष्ठ बंधु जो भीम त्याला म्हणाला—|| ३ || ४ || ५ ||

धर्मराज म्हणतात :— बांधवांची भेट घ्यावी आणि पुण्यश्लोक श्रीकृष्णाच्या लीलांचें ज्ञान करून घ्यावें म्हणून अर्जुनाला आपण द्वारकेस पाठविलें || ६ ||

पण, हे भीमा ! आज सात महिने होऊन गेले, तरी तो तुझा धाकटा बंधु अर्जुन अजून कां बरें परत आला नाहीं ? त्याचें कारण माझ्या तर नीटसें लक्षांत येत नाहीं ||७||

अथवा लीलेसाठीं धारण केलेलें आपलें शरीर सोडून जाण्याची इच्छा श्रीकृष्ण करीत आहे म्हणून ज्या काळासंबंधानें नारदानें आपल्याला सांगितलें तोच तर हा काळ आलेला नसेल ना ? || ८ ||

त्या श्रीकृष्णाच्या साह्यानेंच स्त्रिया, राज्य, आम्हांला संपत्ति, प्राण, कुल आणि संतति हीं प्राप्त झालीं आणि त्याच्याच कृपेनें आम्हांला शत्रूंवर विजय मिळवून दिव्य लोक मिळविण्याचें साधनहि संपादन करतां आलें || ९ ||

हे पुरुषश्रेष्ठा भीमा ! हीं निरनिराळीं दुश्चिन्हें पाहा ! कांहीं आकाशांत होत आहेत, कांहीं पृथ्वीवर घडत आहेत, तर कित्येक देहांतच दिसून येत आहेत. या भयंकर दुश्चिन्हांमुळें मन गांगरून जात आहे आणि लवकरच कांहीं अनर्थ ओढवणार असें तीं सुचवीत आहेत || १० ||

हे भीमा ! माझ्या मांड्या, डोळे आणि दंड हे स्फुरण पावत आहेत व माझ्या हृदयाला कंप सुटला आहे. हीं लक्षणें कांहीं तरी अरिष्ट लवकर येणार असेंच दाखवितात || ११ ||

अरे, तोंडांत जणू काय अग्निच आहे अशी ही भालू उगवणाऱ्या सूर्याकडे पाहून मोठ्यानें रडत आहे. तसाच हा कुत्रा धिटाईनें अगदीं माझ्या समोरच येऊन रडत आहे ॥ १२ ॥

पुरुषश्रेष्ठा भीमा ! गाई वगैरे पवित्र पशु मला डावा घालून जात आहेत आणि उलट गर्दभादि अपवित्र पशु उजवा घालून जात आहेत ! तसेच हे माझे घोडे रडत असलेले मला दिसतात ! ॥ १३ ॥

यमानें पाठविलेला दूतच असा हा पारवा, तसाच हा घुबड आणि हा कावळा मुळींच निद्रा न घेतां अशुभ शब्द करून सर्वत्र शून्याकार करण्याची इच्छा करीत आहेत कीं काय असें वाटतें आणि त्यामुळें माझ्या मनाचा थरकांप झाला आहे ॥ १४ ॥

साऱ्या दिशा धुरानें भरल्यासारख्या दिसतात. चंद्रसूर्यांना खळीं पडत आहेत आणि पृथ्वी तर पर्वतासह कांपत आहे ! तसाच मेघांचा कडकडाट होऊन मोठा विद्युत्पात देखील झाला आहे ! ॥ १५ ॥

अंगाला तीव्रपणें झोंबणारा वारा वाहात असून धूळ उडाल्यामुळें सर्वत्र अंधार पसरला आहे आणि हे मेघ तर जिकडेतिडे अमंगल अशा रक्ताचाच जणू काय वर्षाव करीत आहेत ! ॥ १६ ॥

पाहा ! हा सूर्य निस्तेज झाला आहे. आकाशांत ग्रहांचें परस्पर युद्ध चाललें आहे. पंचमहाभूतांनीं एकमेकांत मिसळ केल्यामुळें पृथ्वी आणि आकाश यांमधील हें अंतराळ पेटल्यासारखें दिसत आहे ! ॥ १७॥

तशाच नद्या, नद आणि सरोवरें खवळून गेलीं आहेत व पाहणारांचीं मनेंहि त्यामुळें क्षुब्ध होत आहेत. हा पाहा अग्नि तुपानें देखील पेटत नाहींसा झाला आहे. काळाच्या मनांत काय करावयाचें आहे कांहीं कळत नाहीं ! ॥ १८ ॥

वासरें आपल्या मातांच्या स्तनांतील दूध पीत नाहींत आणि गाई देखील दूध देत नाहींशा झालेल्या आहेत. गोठ्यांतील गाई रडत असून त्यांचीं मुखें अश्रूंनीं भरलीं आहेत आणि बैल देखील कष्टी दिसत आहेत ॥ १९ ॥

ह्या देवता पाहा ! जशा कांहीं रडूनरडून त्या घामाघूम झाल्या असून चळवळत आहेत. हे देश, गांव, नगरें, उद्यानें, खाणी आणि आश्रम शोभाहीन आणि आनंदहीन झालेले असून आम्हांला कोणकोणत्या संकटांची सूचना देत आहेत कोण जाणे ! ॥ २० ॥

मला तर खरोखर वाटतें कीं, दुसऱ्या 'कोणत्याहि पुरुषाच्या ठिकाणीं न आढळणाऱ्या सौंदर्यानें युक्त अशा भगवान् श्रीकृष्णाच्या पायांना ही पृथ्वी अंतरून सौभाग्यहीन झाली आहे, असेंच हीं मोठीं दुश्चिन्हें दर्शवीत आहेत ! ॥ २१ ॥

अहो शौनकऋषि हो, याप्रमाणें अपशकुन अवलोकन करून धर्मराजा स्वतः मनाशीं विचार करीत असतां अर्जुन द्वारकेहून परत आला ॥ २२ ॥

तो येतांच धर्मराजाच्या पायां पडला; पण त्याचें मुख पूर्वीसारखें निर्भय दिसत नव्हतें. मान खालीं घालून तो आपल्या कमळासारख्या नेत्रांतून अश्रु गाळूं लागला. आपल्या कनिष्ठ बंधूचें तें निस्तेज मुख पाहून धर्मराजाच्या मनाला चरका बसला आणि नारदानें पूर्वीं सांगितलेल्या गोष्टीचें स्मरण होऊन स्नेही मंडळीसमक्षच त्यानें अर्जुनाला विचारलें ॥ २३ ॥ २४ ॥

धर्मराजा म्हणाला :—अर्जुना ! मधु, भोज, दशार्ह, अर्ह, सात्वत, अंधक आणि वृष्णि इत्यादि कुळांतील आपले बांधव द्वारकेंत खुशाल आहेत ना ? ॥ २५ ॥

आपले पूज्य आजोबा शूरसेन खुशाल आहेत ना ? तसेंच वसुदेवमामा आणि त्यांचे कनिष्ठ बंधू यांचेंहि ठीक आहे ना ? ॥ २६ ॥

परस्परांच्या बहिणी असलेल्या देवकी आदिकरून वसुदेवाच्या सात स्त्रिया म्हणजे आपल्या मामी, तसेंच त्यांचे पुत्र आणि सुना या साऱ्यांचें क्षेम आहे ना ? ॥ २७ ॥

उग्रसेन जिवंत आहे ना ? त्याला पुत्र नाहींतच. त्याचा भाऊ हृदीक आपल्या पुत्रांसह खुशाल आहे ना ? अक्रूर, जयन्त, गद, सारण, तसेच आणखी शत्रुजित् वगैरे सर्व ठीक आहेत ना ? यादवांचा पति भगवान् बळराम ह्याचें सुद्धां कुशल आहे ना ? ॥ २८ ॥ २९ ॥

सगळ्या यादवांत शूर अशा महारथ[१] प्रद्युम्नाचें क्षेम आहे ना ? मोठ्या वेगानें रथ नेणारा ऐश्वर्यसंपन्न अनिरुद्धहि आनंदांत असेलच. सुषेण, चारुदेष्ण, जाम्बवतीचा पुत्र सांब तसेंच श्रीकृष्णाचे इतर श्रेष्ठ पुत्र आपल्या ऋषभ वगैरे मुलांसह खुशाल आहेत ना ? ॥ ३० ॥ ३१ ॥

त्याचप्रमाणें श्रुतदेव, उद्धव आदिकरून श्रीकृष्णाचे अनुयायी आणि बळराम व श्रीकृष्ण यांच्या सामर्थ्याच्या आश्रयानें राहणारे सुनन्द, नन्द, शीर्षण्य इत्यादि यादवांतील इतर श्रेष्ठ पुरुष हेहि खुशाल असतीलच. त्यांना आमच्याविषयीं प्रेम वाटतें ना ? आणि आमच्या खुशालीचें त्यांना स्मरण होतें ना ? ॥ ३२ ॥ ॥ ३३ ॥

ब्राह्मणांचें कल्याण करणारा आणि भक्तांवर प्रेम करणारा तो षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीकृष्ण देखील आपल्या इष्टमित्रांसहवर्तमान द्वारकेंतील सुधर्मानामक आपल्या सभेंत खुशाल असतो ना ? ॥ ३४ ॥

बळराम ज्याचा सखा असा तो आदिपुरुष श्रीकृष्ण लोकांच्या कल्याणाकरितां, हिताकरितां आणि उत्कर्षाकरितांच यदुकुलसागरांत अवतीर्ण झाला आहे ॥ ३५ ॥

श्रीकृष्णाच्या बाहूंच्या पराक्रमानें जिचें रक्षण होत आहे, अशा आपल्या द्वारका-नगरींत सर्वांच्या बहुमानास पात्र झालेले यादव विष्णूच्या सेवकांप्रमाणें मोठ्या आनंदानें विहार करीत असतात ॥ ३६ ॥

---

१ **'एको दशसहस्रेण यो युद्ध्येत्स महारथः'** जो एकटा वीर पुरुष दहा हजार योद्ध्यांबरोबर युद्ध करतो त्याला महारथ म्हणतात.

श्रीकृष्णाच्या पदकमलांची सेवा, ह्याच मुख्य कर्माच्या सामर्थ्यानें सत्यभामादि प्रमुख सोळासहस्र स्त्रिया युद्धांत देवांना जिंकून इंद्राणीला योग्य अशा त्यांच्या पारिजातकादि भोग्य वस्तु हरण करतात ॥ ३७ ॥

श्रीकृष्णाच्या बाहुबलावरच खरोखर अवलंबून असल्यामुळें सर्वथा निर्भय झालेले मोठमोठे यादववीर बलात्कारानें हरण करून आणलेल्या व देवश्रेष्ठांना उचित अशा सुधर्मा-नामक सभेंत वारंवार संचार करतात ॥ ३८ ॥

बा अर्जुना! तुझी सुद्धां प्रकृति नीट आहे ना? तुझ्या मुखावरील तेज नष्ट झालेलें दिसतें. बाळा! तूं तेथें फार दिवस राहिल्यामुळें तुझा अपमान आणि तिरस्कार तर झालेला नाहीं ना? ॥ ३९ ॥

तुला कोणी अशुभ आणि कठोर शब्दांनीं ताडन तर केलें नाहीं ना? किंवा याच-कांना आशा उत्पन्न होईल असें वचन देऊन मग तें तूं त्यांना दिलें नाहींस असें तर झालें नाहीं ना? ॥ ४० ॥

तूं आश्रय मागणारांना तो देणारा आहेस; तेव्हां आश्रयासाठीं आलेल्या कोणा ब्राह्मणाला, बालकाला, गाईला, वृद्धाला, रोग्याला, स्त्रीला किंवा दुसऱ्या प्राण्याला तूं उपेक्षापूर्वक झिडकारलेंस तर नाहीं ना ॥ ४१ ॥

अरे, तूं गमन करण्यास अयोग्य अशा स्त्रीशीं किंवा गमनार्ह स्त्रीचा अनादर करून तिच्याशीं गमन केलें नाहींस ना? अथवा तुझ्या समबलांनी किंवा तुझ्याहून नीचांनीं वाटेंत तुझा पराजय केला नाहीं ना? ॥ ४२ ॥

भोजन देण्यास योग्य अशा वृद्धांना किंवा बालकांना वगळून तूं भोजन केलेंस कीं काय? अनुचित असें कांहीं निन्द्य कर्म तुझ्याकडून घडलें नाहीं ना ॥ ४३ ॥

अरे, किंवा असें तर नाहीं ना? कीं अत्यंत प्रिय आणि तुझें हृदयच जणूं काय असा जो तुझा अंतरींचा मित्र कृष्ण, त्याच्या विरहाची तुला सारखी रुखरुख वाटूं लागली? याशिवाय दुसरी पीडा कांहीं तुझ्या ठिकाणीं दिसत नाहीं! ॥ ४४ ॥

## चौदावा अध्याय समाप्त

# अध्याय १५ वा

अर्जुन श्रीकृष्णवियोगानें फारच कृश झाला होता; कृष्णाला तो जिवलग मानीत असे. श्रीकृष्णविरहामुळें त्याची मूर्ति निस्तेज दिसत होती. त्याचें तोंड सुकून गेलें होतें. वडील भाऊ जो धर्म त्यानें त्याची अनेक प्रकारें शंकास्पद मुद्रा पाहून त्याला पुष्कळ प्रकारचे प्रश्न विचारले; पण त्याला सारखें श्रीकृष्णाचें ध्यान लागल्यामुळें त्याच्या तोंडून कांहींच उत्तर निघालें नाहीं ॥ १ ॥ २ ॥

त्यानें मोठ्या कष्टानें शोक आवरून हातानें डोळे पुसले आणि ज्या श्रीकृष्णाशीं सारथ्यादि कृत्यांमुळें त्याला सहवास घडला, मित्रत्व संपादितां आलें व हृदयाचा गोडपणा प्रत्ययास आला, त्याचें स्वरूप दृष्टीआड झाल्यामुळें तो चिंतेनें अगदीं व्याकुळ झाला आणि पूर्वीच्या गोष्टींचें स्मरण करीत करीत सद्गदित कंठानें अडखळत अडखळत आपला श्रेष्ठ बंधु जो धर्मराजा, त्याला म्हणाला :--॥ ३ ॥ ४ ॥

हे धर्मराजा ! बंधूप्रमाणें असणाऱ्या श्रीकृष्णानें मला चांगलेंच फसविलें. कसें म्हणशील तर जो माझा पराक्रम पाहून देव सुद्धां थक्क होऊन जात असत त्या माझ्या पराक्रमाचें त्यानें हरण केलें. ॥ ५ ॥

जसा प्राण्याच्या शरिरांतून प्राण निघून गेला असतां उरलेल्या शरिराला लोक मेलेलें म्हणतात, तसा श्रीकृष्ण निघून गेल्यामुळें हें सर्व जग सुद्धां मला खरोखर मेल्यासारखें दिसूं लागलें आहे ॥ ६ ॥

त्याच्याच कृपेनें स्वयंवरांत द्रुपद राजाच्या घरीं आलेल्या सर्व गर्विष्ठ राजांचें तेज मीं हरण केलें आणि धनुष्य सज्ज करून मत्स्याचा[१] वामनेत्र विद्ध केला आणि द्रौपदीची प्राप्ति करून घेतली ॥ ७ ॥

हे धर्मराजा ! श्रीकृष्ण सन्निध असल्यामुळें इंद्रादि देवांना त्वरेनें जिंकून मी अग्नीला खांडववन दिलें. त्याच्या कृपेनें राजसूय यज्ञांत मयासुरानें निर्माण केलेली कलाकौशल्यानें युक्त अशी सभा मला प्राप्त झाली. त्याच्याच जोरावर राजसूय यज्ञाच्या प्रसंगीं सर्व राजांनीं तुला दाही दिशांहून करभार आणून दिला ॥ ८ ॥

---

१ हें मत्स्ययंत्र द्रुपद राजानें द्रौपदीच्या स्वयंवरप्रसंगीं राजसभेंत विजेच्या पंख्याप्रमाणें फिरतें ठेवलें होतें; त्याखालीं उकळलेल्या तेलानें भरलेली एक कढई ठेविलेली असून तेथेंच एक मोठें धनुष्य व कित्येक बाण ठेवले होते. जो कोणी वीर, क्षत्रिय किंवा ब्राह्मण सत्कुलांत जन्मलेला असून तें धनुष्य सज्ज करून त्याला बाण लावील व कढईतील तेलांत पडलेल्या प्रतिबिंबित मत्स्ययंत्राला पाहून वरील मत्स्याच्या वामनेत्राचा वेध करील त्याला द्रौपदी द्यावयाची, असा पण द्रुपदानें केला होता व तो पण अर्जुनानें जिंकिला.

त्याच्याच प्रभावानें दहा हजार हत्तींचें सामर्थ्य असणाऱ्या भीमदादांनीं सर्व राजांच्या मस्तकांवर पाय देणाऱ्या जरासंघाला मारलें आणि महाभैरवाच्या पूजाप्रसंगीं बळी देण्याकरितां त्यानें नेलेल्या राजांना सोडवून आणलें व त्यामुळेंच ते राजे आपल्या राजसूय यज्ञांत पुष्कळ नजराणे घेऊन आले ॥ ९ ॥

राजसूययज्ञांत अभिषेक झाल्यामुळें तुझ्या पट्टराणी द्रौपदीच्या रमणीय केशकलापाला मोठेंपण आलें होतें; पण त्याचा विचार न करतां कपटी दुर्योधनादिकांनीं त्याला स्पर्श करून भरसभेंत ते विस्कळित केले ! द्रौपदीच्या नेत्रांतून त्या वेळीं अश्रूंचा ओघ निघून मुखावरून तिच्या पायांवर पडत होता; पण पुढें त्या श्रीकृष्णाच्या कृपेनेंच त्या दुष्टांच्या स्त्रिया पतिवधामुळें विमुक्तकेश[1] झाल्या ॥ १० ॥

हजारों ऋषि बरोबर घेऊन भोजनासाठीं आलेल्या दुर्वासऋषीनें आमचा शत्रु जो दुर्योधन त्याच्या सांगण्यावरून उपस्थित केलेलें आमच्यावरील महा संकट, श्रीकृष्णानें अरण्यांत आमच्याकडे येऊन व शेष राहिलेलें भाजीचें पान खाऊन वारलें आणि स्नानासाठीं नदींत उतरलेल्या ऋषिसमूहाला त्रैलोक्य तृप्त झाल्यासारखें त्यानें वाटावयास लावलें ॥ ११ ॥

आणखी श्रीकृष्णाच्या प्रभावानें मीं पार्वतीसहवर्तमान भगवान् शंकराला सुद्धां युद्धांत संतुष्ट केल्यामुळें त्यानें आपलें पाशुपतास्त्र मला दिलें आणि इतर देवांनीं दुसरीं अस्त्रें दिलीं. त्याच्याच कृपेनें ह्याच देहानें इंद्रलोकांत जाऊन इंद्राच्या अर्ध्या आसनावर बसण्याचा मान मीं मिळविला ॥ १२ ॥

हे धर्मा ! हातांत गांडीव धनुष्य घेऊन मीं इंद्रलोकांत विहार करीत असतां माझा पराक्रम पाहून देवांनीं सुद्धां आपल्या शत्रूंच्या वधासाठीं ज्या श्रीकृष्णाच्या कृपेनें प्रभावशाली झालेल्या माझ्या बाहूंचा आश्रय केला, त्या तेजस्वी श्रीकृष्णानें मला आज फसविलें ॥ १३ ॥

श्रीकृष्णाच्या साहाय्यानेंच मी अनंत व अतुल बलशाली असा कौरवांचा सेनासमुद्र रथांत बसून एकट्यानें तरून गेलों, शत्रूपासून पुष्कळ द्रव्य हिरावून घेतलें आणि अश्वत्थाम्याच्या मस्तकांतून तेजस्वी मणि काढून घेतला ॥ १४ ॥

हे धर्मराजा, त्या श्रीकृष्णानें माझ्या अग्रभागीं राहून युद्धभूमीवर श्रेष्ठ क्षत्रियांच्या अनेक रथांनीं शोभायमान झालेल्या कर्ण, द्रोण व शल्य ह्यांच्या सैन्यांतील सेनापतींचें आयुष्य, सामर्थ्य व अस्त्रकौशल्य आणि मनेंसुद्धां आपल्या दृष्टिप्रभावानें नष्ट करून टाकलीं ॥ १५ ॥

---

१ पतिनिधनानंतर वैधव्य प्राप्त झालेल्या स्त्रिया पूर्वी वेणीबंधन न करतां केश नुसते मोकळे ठेवीत.

नरसिंहभक्त प्रल्हादावर सोडिलेलीं दैत्यांचीं अस्त्रें जशीं फुकट गेलीं, तशीं भीष्म, कर्ण, अश्वत्थामा, सुशर्मा, शल्य, जयद्रथ, बाल्हिक इत्यादि वीरांचीं अमोघ सामर्थ्यवान् अशीं अस्त्रें सुद्धां मीं त्या श्रीकृष्णाच्या बाहूंचा आश्रय केल्यामुळें मला स्पर्श करूं शकलीं नाहींत ! ॥ १६ ॥

साधु लोक मोक्षप्राप्तीकरितां ज्याचें भजन करितात, ज्याच्या पराक्रमाच्या जोरावर निस्तेज झालेले रथारूढ शत्रु, घोडे दमल्यामुळें युद्धभूमीवर रथांतून खालीं उतरलेल्या मला मारूं शकले नाहींत, त्या आत्मस्वरूपाची प्राप्ति करून देणाऱ्या श्रीकृष्णाला दुर्बुद्धीमुळें मी सारथ्यकर्म करण्यास लावलें ! ॥ १७ ॥

हे धर्मराजा ! श्रीकृष्णानें थट्टेनें, " हे कुंतीपुत्रा, हे अर्जुना, हे मित्रा, हे सखे, हे कुरुनन्दना " अशीं औदार्यानें व रमणीय स्मितपूर्वक माझी नांवें घेऊन माझ्याशीं चटका लावणारीं भाषणें केलीं ! अशा त्या कृष्णाचें स्मरण होऊन माझें अंतःकरण आज दुःखानें क्षुब्ध होत आहे ॥ १८ ॥

निजतांना, बसतांना, बोलतांना किंवा भोजन करतांना परकेपणाच्या अभावीं 'मित्रा ! तूं फारच खरें बोलणारा आहेस,' अशी त्याची मीं उपरोधिकपणें निंदा करावी; अशी मस्करी करीत असतांहि मित्र मित्राचे अपराध सहन करतो किंवा बाप मुलाचे अपराध पोटांत घालतो, त्याप्रमाणें अज्ञानी अशा माझे सर्व अपराध श्रीकृष्णानें आपल्या मनाच्या मोठेपणामुळें पोटांत घातले ॥ १९ ॥

हे धर्मराजा ! माझा प्रियमित्र जो पुरुषश्रेष्ठ श्रीकृष्ण त्याच्या वियोगानें मनाला दुःख होऊन वाटेंत त्याच्या स्त्रियांचें रक्षण करीत असतां, दुष्ट गोपांनीं माझा एखाद्या निर्बल स्त्रीप्रमाणें पाडाव केला !॥ २० ॥

ज्यांच्यामुळें सर्व राजे मला नम्र होत होते तेंच धनुष्य, तेच ते बाण, तोच तो रथ, तेंच घोडे व तोच रथांत बसणारा मी अर्जुन, असे असतां सुद्धां, श्रीकृष्णाच्या अभावीं कपटानें मिळविलेल्या धनाप्रमाणें, राखेंत हवन केलेल्या हविर्भागाप्रमाणें किंवा क्षारभूमींत पेरलेल्या धान्याप्रमाणें तें सर्व एका क्षणांत व्यर्थ होऊन गेलें ! ॥ २१ ॥

हे धर्मराजा ! द्वारकेंत राहणाऱ्या ज्या आप्तेष्टांच्या खुशालीबद्दलचा प्रश्न तू विचारलास ते सर्व यादव, ब्राह्मणाच्या शापानें मोहित होऊन वारुणी नामक मद्याच्या मदानें धुंद झाले आणि एकमेकांची ओळख जणूं काय न ठेवतां एकमेकांवर मुष्टिप्रहार करून त्यांनीं एकमेकांचा वध केला. अवघे चार पांच जिवंत राहिले आहेत ॥२२॥२३॥

प्राणिमात्र जो एकमेकांचा संहार करतात किंवा जें एकमेकांचें पालनपोषण करतात, ती ही सर्वगुणसंपन्न भगवान् परमेश्वराची लीलाच होय ॥ २४ ॥

हे धर्मराजा, जलचर प्राण्यांत मोठे असतात ते लहानांना खातात, बलिष्ठ दुर्बलांना खातात आणि मोठे व बलिष्ठ एकमेकांना खातात. त्याप्रमाणें श्रीकृष्णानें प्रथम बलाढ्य

अशा मोठ्या यादवांकडून इतर दुष्टांचा नाश करविला आणि नंतर यादवांकडून यादवांचा नाश करून पृथ्वीचा भार दूर केला! ॥ २५ ॥ २६ ॥

देशकालाला अनुसरून बोललेलीं व हृदयांतील आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक असे तीनहि ताप नाहींसे करणारीं तीं श्रीकृष्णाचीं भाषणें आठवतांच माझें अन्तःकरण हरण करून नेतात ॥ २७ ॥

ह्याप्रमाणें श्रीकृष्णावरील दृढ प्रेमामुळें त्याच्या पदकमलांचें चिंतन करणाऱ्या अर्जुनाची बुद्धि अगदीं शांत आणि निर्मळ झाली ॥ २८ ॥

श्रीकृष्णचरणाच्या निदिध्यासानें अर्जुनाच्या मानसिक शक्तीचा वेग वाढला आणि एकनिष्ठ भक्तीमुळें त्याच्या बुद्धीवरील सर्व मळाचें आवरण धुऊन निघालें ॥ २९ ॥

युद्धाच्या आरंभीं श्रीकृष्णानें भगवद्गीतेच्या रूपानें जें ज्ञान सांगितलें, पण जें पुष्कळ काळ जाऊन अनेक सांसारिक कर्मे व अज्ञान यांमुळें नष्टप्राय झालें होतें, त्याचें अर्जुनाला आतां पुनः स्मरण झालें ॥ ३० ॥

त्या आत्मज्ञानाच्या स्मरणानें अर्जुन शोकरहित झाला. त्याचे द्वैतविषयक सर्व संशय पार नाहींसें झाले आणि त्याची त्रिगुणात्मिका प्रकृति निर्गुणपुरुषांत लीन झाल्यामुळें तो सूक्ष्म[१] शरिरानें रहित होऊन जन्ममरणरूपी संसारापासून मुक्त झाला ॥ ३१ ॥

श्रीकृष्णाचें प्रयाण व यादवांचा नाश, हीं ऐकून धर्मराजानें आपलें मन स्थिर केलें व स्वर्गाच्या मार्गाला लागण्याचें ठरविलें ॥ ३२ ॥

अर्जुनानें सांगितलेली यादवांच्या नाशाची व श्रीकृष्णाच्या प्रयाणाची वार्ता ऐकून कुंतीनें परमेश्वरावरील आपल्या आत्यंतिक भक्तीच्या योगें आपलें मन भगवान् श्रीकृष्णाच्या ठिकाणीं स्थिर केलें आणि ती संसारापासून निवृत्त झाली ॥ ३३ ॥

कांट्यानेंच कांटा काढावा, त्याप्रमाणें श्रीकृष्णानें जें शरीर धारण करून पृथ्वीचा भार दूर केला तें शरीरहि त्यानें टाकून दिलें; कारण हीं दोन्ही कृत्यें परमेश्वराला सारखींच आहेत ॥ ३४ ॥

नाटकी पुरुष नाटकांत सोंग घेतो व मग तें टाकतो, किंवा परमेश्वर मत्स्यादि रूपें घेऊन मग तीं टाकून देतो त्याप्रमाणें श्रीकृष्णानें ज्या शरिरानें पृथ्वीचा भार दूर केला तें शरीर सोडून दिलें ॥ ३५ ॥

---

१ शरिरें चार प्रकारचीं आहेत : १ स्थूल, २ सूक्ष्म, ३ कारण व ४ महाकारण- हस्तपादादि अवयवांनीं युक्त प्रत्यक्ष दिसणारें जें शरीर तें स्थूल शरीर. ह्या स्थूल शरिराच्या आंत दुसरें सूक्ष्म शरीर आहे; ह्यालाच मनोमय शरीर म्हणतात. हें शरीर अंगठ्याएवढें लहान आहे. आपण निजलों असतां स्वप्नांत मी गावाला गेलों, राजा झालों वगैरे जें पाहतों, हें सर्व सूक्ष्म शरिराचें कार्य होय. सूक्ष्म शरिरामुळें जन्ममरणादि होतात. त्याच्या आंत कारणशरीर. तें प्रकृति, महत्तत्त्व, बुद्धि व अहंकार ह्या चार पदार्थांनीं बनलेलें असतें. त्या कारणशरिराच्या आंत महाकारण म्हणजे जीवात्मा व शिवात्मा ह्यांच्या सान्निध्यानें राहणारें शरीर.

ज्याच्या कथा फारच ऐकण्याजोग्या आहेत, असा तो षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीकृष्ण ज्या दिवशीं स्वशरिरानें हा लोक सोडून निजधामाला गेला, त्या दिवसापासूनच अज्ञानी लोकांच्या अधर्माला प्रोत्साहन देणाऱ्या कलीचें युग सुरू झालें ॥ ३६ ॥

आपल्या राज्यांत, प्रत्येक नगरांत व घरोघर कलीचा प्रभाव वाढून तीं तद्रूप झालीं आहेत व त्यामुळें सर्व लोक लोभ, असत्य, कपट, हिंसा वगैरे दोषांनीं व्यापून आहेत, असें पाहून धर्मराजानें हें जग सोडून स्वर्गांत प्रयाण करण्याचा निश्चय केला ॥ ३७ ॥

नंतर त्या सार्वभौम धर्मराजानें, गुणांनीं स्वतःसारखा आणि विनयशील असा जो आपला नातू परीक्षित्, त्याला समुद्रवलयांकित पृथ्वीचा राजा म्हणून हस्तिनापुरांत अभिषेक करविला ॥ ३८ ॥

त्याचप्रमाणें अनिरुद्धाच्या वज्रनामक पुत्राला युद्धिष्ठिरानें मथुरेंत राज्याभिषेक करून शूरसेन देशाच्या राज्यावर बसविलें. नंतर त्यानें स्वतः प्राजापत्य[1] नांवाची इष्टि केली आणि अग्नीचें[2] प्राशन केलें ॥ ३९ ॥

तसेंच रेशमी वस्त्रें,सुवर्णाचे अलंकार इत्यादि सर्व वस्तु टाकून देऊन तसेंच मीपणा आणि अभिमान इत्यादि सर्व सोडून, धर्मानें सर्व सांसारिक पाश तोडून टाकले. मग त्यानें वाणीचें मनांत, मनाचें प्राणांत व प्राणाचें अपानांत असें हवन केलें. त्यानंतर मूत्रपुरीषादि उत्सर्गक्रियेसह अपानाला त्यानें मृत्यूंत आणि मृत्यूला पञ्चभौतिक तत्त्वांत लीन करून टाकलें ॥ ४० ॥ ४१ ॥

नंतर एखाद्या मुनीप्रमाणें त्यानें मौन धारण करून पाञ्चभौतिक तत्त्वांना त्रिगुणांत व त्रिगुणांना प्रकृतींत लीन केलें व हें सर्व आत्म्यांत लीन करून शेवटीं त्या आत्म्याचें अविनाशी अशा ब्रह्मांत[3] हवन केलें ॥ ४२ ॥

---

१ अग्निहोत्र चातुर्मास्य वगैरे विधींनीं गृहस्थाश्रमी पुरुषानें आपल्या घरांत नेहमीं अग्नि ठेवला पाहिजे. त्या अग्नीचें रोज पूजन करून त्याला समिध व पुरोडाश अर्पण करावयाचा असतो. त्या अग्नीच्या निमित्त प्रत्येक महिन्यास दर्शेष्टि व पौर्णमासेष्टि करावयाची असते; तशीच विशिष्ट प्रसंगीं प्रजापतिदेवताक प्राजापत्येष्टि करावी लागते. ती इष्टि धर्मानें केली.

२ " आत्मन्यग्नीन्यमारोप्य " असें मनुस्मृतींत म्हटल्याप्रमाणें धर्मराजानें प्रजापत्येष्टि केल्यानंतर अग्निदेवताक मंत्र म्हणून व त्या अग्निजन्य भस्माला पाण्यांत कालवून दक्षिणाग्नि, गार्हपत्य व आहवनीय अशा तीनहि अग्नींची भस्ममिश्रित जलप्राशनानें आत्म्यांत स्थापना केली.

३ **" अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथा परे ॥ प्राणापानगती रुध्वा प्राणायामपरायणाः "** [ भगवद्गीता ] ह्या प्राणायामाच्या विधीप्रमाणें एक एक व्यापार अभ्यासयोगें कमी करून देहत्याग केल्यानें मुक्ति मिळते असा शास्त्रसिद्धांत आहे.

नंतर धर्मराजानें फाटकीं वस्त्रें धारण केलीं, खाण्यापिण्याचा त्याग केला आणि केस मोकळे सोडून एक शब्दहि न बोलतां आपण जणूं काय निर्जीव किंवा उन्मत्त अथवा पिसाट झालों आहों असें दाखवीत—॥ ४३ ॥

इकडेतिकडे न पाहतां, बहिऱ्याप्रमाणें कांहीं एक न ऐकतां, तो त्या हस्तिनापुरांतून निघाला व ज्या दिशेला आपले पूर्वज गेले त्या उत्तर दिशेकडे जाऊं लागला. हृदयांत ब्रह्माचें चिंतन करीत त्या ठिकाणीं जो जातो त्याला परत संसारांत यावें लागत नाहीं ॥ ४४ ॥

पृथ्वीवर सर्वत्र अधर्माला उत्तेजन देणाऱ्या कलीनें प्रजेला ग्रस्त केलें आहे असें पाहून त्याच्या भीमार्जुनादि चार भावांनींहि तसाच निश्चय केला आणि तेहि त्याच्या मागोमाग गेले ॥ ४५ ॥

धर्म, अर्थ आदि करून पुरुषार्थ उत्तम रीतीनें साध्य करून घेतलेल्या त्या पांडवांनीं जवळच असणारें श्रीकृष्णाचें चरणकमळ हें आपलें अंतिम ध्येय असें समजून तेंच मनांत सतत धारण केलें ॥ ४६ ॥

श्रीकृष्णाच्या ध्यानानें भक्ति दृढ होऊन बुद्धि निर्मळ झाली असतां पांडवांनीं निष्पाप सज्जनांचें निवासस्थान असें जें नारायणाचें पदकमल त्या ठिकाणीं आपली बुद्धि स्थिर केली आणि विषयलंपट अशा दुराचरणी पुरुषांना मिळण्यास कठीण अशा पदाची प्राप्ति निष्कलंक अशा मनानेंच करून घेतली ॥ ४७ ॥ ४८ ॥

ज्ञानी विदुर[1] सुद्धां आपला देह प्रभासक्षेत्रीं टाकून देऊन आणि श्रीकृष्णावरील उत्कट भक्तीनें त्याच्या ठिकाणीं चित्त आसक्त करून आपल्या स्थानाला गेला ॥ ४९ ॥

आपले पति सर्वसंगपरित्याग करून निजधामाला जाण्यास निघाले असें पाहून द्रौपदीनेंहि श्रीकृष्णाच्या ठिकाणीं आपल्या बुद्धीची एकाग्रता केली आणि ती भगवत्पदाला प्राप्त झाली ॥ ५० ॥

जो कोणी ह्याप्रमाणें वर्णिलेल्या भगवंताला प्रिय अशा पांडवांचें हें स्वर्गारोहणवृत्त वारंवार ऐकतो त्याची परमेश्वरावर दृढ भक्ति होऊन तो सद्गतीला प्राप्त होतो ॥ ५१ ॥

---

१ विदुर हा मांडव्यऋषीच्या शापानें शंभर वर्षेंपर्यंत शूद्र योनींत जन्मलेला यम होय. हा व्यासापासून विचित्रवीर्याच्या दासीच्या पोटीं जन्मास आला. अ. १३, श्लो. १५ पाहा.

## पंधरावा अध्याय समाप्त

# अध्याय १६ वा

सूत म्हणतात—शौनक हो! पांडवांच्या स्वर्गारोहणानंतर भाग्यवान् व सर्वगुणसंपन्न परीक्षित्‌राजा, ब्राह्मणांनीं त्याच्या जन्मकाळीं वर्तविलेल्या जातकाला अनुरूप अशाच रीतीनें श्रेष्ठ ब्राह्मणांच्या उपदेशप्रमाणें राज्य करूं लागला ॥ १ ॥

त्यानें आपला मामा जो उत्तर त्याच्या इरावती नांवाच्या मुलीशीं[1] विवाह केला व तिच्यापासून त्याला जनमेजय आदिकरून चार पुत्र झाले ॥ २ ॥

परीक्षित्‌राजानें कृपाचार्याला आपला गुरु करून गंगेच्या काठीं तीन अश्वमेध यज्ञ केले आणि ब्राह्मणांना पुष्कळ दक्षणा दिली. त्याच्या यज्ञांत इंद्रादि देव प्रत्यक्षच आपला हविर्भाग घेत असत ॥ ३ ॥

त्या शूर परीक्षितानें केलेल्या एका दिग्विजयाच्या प्रसंगीं, कलिपुरुष राजासारखीं चिन्हें धारण करून गाय व बैलांच्या जोड्याला लाथेनें प्रहार करीत होता. तें पाहून परीक्षितानें आपल्या सामर्थ्यानें त्याचें नियमन केलें ॥ ४ ॥

शौनकादि ऋषि म्हणतात—हे सूता! परीक्षित्‌राजानें दिग्विजयप्रसंगीं कोणत्या कारणास्तव कलीला अटकावून ठेविलें? राजचिन्हें धारण करून शूद्ररूपानें गाईला लत्ताप्रहार करणारा तो होता तरी कोण? ॥ ५ ॥

हे भाग्यवान् सूता! माझ्या प्रश्नांत जर श्रीकृष्णलीलांचा किंवा कृष्णचरणरूप कमलांतील मधुर रसाचा आस्वाद घेणाऱ्या साधूंच्या कथांचा संबंध असेल तरच त्याचें उत्तर द्या. ज्यामुळें आयुष्याचा निष्कारण नाश होतो अशा निरर्थक भाकडकथा ऐकून काय उपयोग?॥ ६ ॥

सत्याची इच्छा करणाऱ्या परंतु अल्पायु अशा प्राण्यांचा नाश करणाऱ्या काळाला शामित्र नांवाच्या यज्ञकर्मांत आमंत्रण देऊन बोलाविलेलें आहे; त्यामुळें हा यज्ञ चालू आहे तोंपर्यंत येथें असणाऱ्या कोणत्याहि प्राण्याला मृत्यूची भीति नाहीं ॥ ७ ॥

शौनक हो, ह्या पृथ्वीतलावर श्रीकृष्णकथारूपी अमृत यथेच्छ पिण्याची संधि मिळावी म्हणूनच मृत्यूला मोठमोठ्या ऋषींनीं आमंत्रण देऊन ह्या यज्ञांत बोलाविलें आहे ॥ ८ ॥

आळशी, अल्पबुद्धि व अल्पायु अशा प्राण्यांचें आयुष्य रात्रीं झोंप घेण्यांत व दिवसा निरर्थक कामें करण्यांत खरोखर नाहींसें होतें ॥ ९ ॥

---

१ मामेबहिणीशीं म्हणजे मामाच्या मुलीशीं लग्न लावण्याची जी आजहि कांहीं ठिणाणीं चाल आहे, तिचें हें पौराणिक उदाहरण होय.

सूत म्हणतातः—शौनक हो, आपल्या राज्यांतील कुरुजांगल देशांत राहत असतां परीक्षित्राजानें जेव्हां असें ऐकलें कीं, त्यांत कलीचा प्रवेश झाला आहे, तेव्हां ती अनिष्ट वार्ता ऐकून त्या युद्धकुशल राजानें तत्काल हातांत धनुष्य घेतलें ॥ १० ॥

नंतर सुंदर रीतीनें सजविलेल्या, श्यामवर्ण घोडे जुंपलेल्या आणि वर सिंहध्वज फडकत असलेल्या रथांत तो बसला आणि हत्ती, घोडे, रथ व पायदळ अशी चतुरंग सेना घेऊन दिग्विजय करण्यासाठीं आपल्या नगरांतून तो बाहेर पडला ॥ ११ ॥

भद्राश्व, केतुमाल, भारत, उत्तरकुरु व किंपुरुष वगैरे अनेक खंडें त्यानें जिंकलीं आणि त्यांच्याकडून करभार घेतला ॥ १२ ॥

तो जेथें जेथें गेला, तेथें तेथें कृष्णाचें माहात्म्यवर्णन ज्यांत आहे असे आपल्या पूर्वजांचे पराक्रम गायिलेलेच त्याच्या ऐकण्यांत आले. अश्वत्थाम्याच्या अस्त्रापासून झालेल्या स्वतःच्या रक्षणाची कथा, त्याचप्रमाणें यादव आणि पांडव यांमधील प्रेमळ संबंध आणि त्यांची कृष्णावरील भक्ति हीं ऐकून त्याला मोठा संतोष वाटला आणि प्रेमानें त्याचे नेत्र प्रफुल्लित होऊन उदार अंतःकरणानें त्या लोकांना त्यानें अतिशय मूल्यवान् वस्त्रें आणि हार अर्पण केले ॥ १३ ॥ १४ ॥ १५ ॥

आपल्यावर प्रेम करणाऱ्या पांडवांकरितां श्रीकृष्णानें सारथ्याचें काम केलें, सभापतित्व सांभाळिलें, केव्हां सेवकाप्रमाणें तर केव्हां मित्राप्रमाणें वर्तन केलें, प्रसंगीं दूताची कामगिरी केली, युद्धांत साहाय्य करून त्यांचा पाठीराखेपणा केला, त्यांची स्तुति केली आणि त्यांना नमस्कारहि केला. या सर्व गोष्टी जाणून आणि असा हा श्रीकृष्ण जगाच्या वंदनाला पात्र आहे असें पाहून, परीक्षित् राजा त्याच्या चरणकमलाची भक्ति करूं लागला ॥ १६ ॥

ह्याप्रमाणें तो राजा आपले पूर्वज जे पांडव त्यांच्या चरित्राचें अनुकरण करीत असतां अगदीं जवळच्या एका प्रदेशांत एक फारच आश्चर्यजनक गोष्ट घडून आली. ती तुला सांगतों, ऐकून घे ॥ १७ ॥

एका[1] पायावर लंगडत चालणारा धर्म, निस्तेज व बालक मृत झालेल्या आई-प्रमाणें डोळ्यांतून आंसवें गाळणारी गाय भेटली असतां तिला विचारूं लागला, ॥ १८ ॥

हे कल्याणि ! तूं खुशाल आहेस ना ? तुझें मुख असें म्लान आणि निस्तेज कां दिसतें ? हे गोमाते, तुझ्या मनांत कांहीं तरी चिंता उत्पन्न झाली आहे असें मला दिसतें; तुझा कोणी बांधव परदेशाला गेल्यामुळें तूं शोक करितेस काय ? ॥ १९ ॥

---

१ '**चतुष्पात्सकलो धर्मः सत्यं चैव कृते युगे**' ह्या नियमाप्रमाणें कृतयुगांत धर्म चारहि पायांनीं पूर्ण होता. पुढें त्रेतायुगांत त्याचा एक पाय, द्वापरयुगांत दुसरा व कलियुगांत तिसरा पाय नाहींसा होऊन तो एकाच पायावर चालूं लागला, अशी कल्पना आहे.

माझे तीन पाय नष्ट झाल्यामुळें मी एकाच पायानें चालत आहें, म्हणून तुला दुःख होत आहे काय ? किंवा ह्यानंतर शूद्र लोक आपला उपभोग घेतील अशा धास्तीनें तूं स्वतःबद्दल शोक करित्येस काय ? किंवा ह्यापुढें यज्ञयागादि कृत्यें बंद पडतील व त्यामुळें देवांना हविर्भाग न मिळून ते उपाशी राहतील असें समजून त्या देवांबद्दल तूं शोक करित्येस काय ? किंवा येथून पुढें इंद्र बरोबर पाऊस पाडणार नाहीं असें समजून तूं सर्व प्रजेच्याबद्दल शोक करित्येस काय ? ॥ २० ॥

हे भूमाते ! स्त्रियांचें रक्षण चांगल्या प्रकारें होणार नाहीं किंवा लहान लहान मुलें राक्षसादिकांनीं त्रस्त होतील असें समजून त्याबद्दल अथवा ब्राह्मण वेदवाणीची दुर्दशा करतील अशा समजुतीनें किंवा ब्राह्मणांचा नाश करणाऱ्या क्षत्रियकुलांत उत्पन्न झालेल्या कुलीन पुरुषांवर येणाऱ्या संकटांना उद्देशून तूं दुःख करित्येस काय ? ॥ २१ ॥

कलिकालानें व्याप्त होऊन क्षत्रिय अधम होतील, राज्यांचा नाश होईल, अथवा जिकडेतिकडे लोक, खाणें, पिणें, उत्तम वस्त्रें परिधान करणें, सुगंधी उट्या लावणें, स्नान करणें, स्त्रीसंभोग इत्यादिकांतच दंग होतील म्हणून तुला दुःख होत आहे काय ? ॥ २२ ॥

हे भूमाते ! किंवा तुला झालेला दुष्ट राजांचा भार नाहींसा करण्यासाठीं अवतार घेतलेला श्रीकृष्ण तुला सोडून निजधामाला गेल्यामुळें, मोक्षसुखालाहि तुच्छ करणाऱ्या त्याच्या विरहानें तूं शोक करत्येस काय ? ॥ २३ ॥

किंवा हे माते पृथ्वी ! बलाढ्यांतहि बलाढ्य अशा काळानें, देवांनाहि मान्य असलेलें तुझें वैभव हरण केल्यामुळें तूं अशी कृश झाली आहेस काय ? तुझ्या मनाला दुःख होण्याचें कारण काय आहे तें मला सांग ॥ २४ ॥

पृथ्वी म्हणाली, बा धर्मा ! जें जें तूं मला विचारलेंस तें तें सर्व तुला माहीत आहेच. असें पाहा कीं, लोकांना सुख उत्पन्न करणाऱ्या चार पायांनीं वास्तविक तूं युक्त असावयाचा—॥ २५ ॥

हे सर्वगुणसंपन्न धर्मा ! सत्य, शुद्धि, कृपा, सहनशीलता, सर्वसंगपरित्याग, आनंद, सरलता, शांति, इन्द्रियनिग्रह, तपश्चर्या, समबुद्धि, क्रोधराहित्य, उदासीनपणा, शास्त्रश्रवण, आत्मज्ञान, वैराग्य, विपुलता, पराक्रम, तेज, सामर्थ्य, आठवण, स्वतंत्रता, नैपुण्य, सौन्दर्य, धैर्य आणि मृदुपणासुद्धां, प्रौढपणा, नम्रता, स्वभाव, मानसिक शक्ति, बौद्धिक शक्ति, गंभीरपणा, स्थिरपणा, श्रद्धा, कीर्ति, पूज्यता, अहंकाराहित्य, हे आणि दुसरेहि कित्येक मोठेपणाची इच्छा करणाऱ्यांनीं प्रार्थना करण्याजोगे मोठमोठे गुण ज्याच्या ठिकाणीं नित्य राहत होते आणि ज्याला सोडून त्यांतील एकहि गुण गेला नाहीं, त्या सर्व गुणांचें आगर आणि लक्ष्मीचें वसतिस्थान अशा श्रीकृष्णानें या लोकाचा त्याग केला आणि दुष्ट कलीची दृष्टि त्यावर वळली, हें पाहून मीं सांप्रत शोक करीत आहें ॥ २६ ॥ २७ ॥ २८ ॥ २९ ॥ ३० ॥

त्याचप्रमाणें मीं स्वतःबद्दल, तुझ्याबद्दल, देवराज इंद्राबद्दल, तसेंच पितर, ऋषि, साधु, ब्राह्मणादि चारी वर्ण आणि ब्रह्मचर्यादि चारी आश्रम, या सर्वांबद्दल शोक करीत आहें ॥ ३१ ॥

ब्रह्मदेव आदिकरून देवांनीं सुद्धां ज्याचा कृपाकटाक्ष आपल्याकडे वळावा या इच्छेनें बहुत काळ तपश्चर्या केली, तसेंच ऐश्वर्यशाली पुरुषांचा आश्रय अशी लक्ष्मी आपलें कमलांतील स्थान सोडून ज्याच्या पदसौंदर्यावर लुब्ध होऊन त्याचा यथेच्छ उपभोग घेते–॥ ३२ ॥

त्या भगवान् श्रीकृष्णाच्या, कमल, वज्र, अंकुश आणि ध्वज हीं चिन्हें धारण करणाऱ्या कांतियुक्त चरणांनीं माझें अंग विभूषित होत होतें; आणि त्या ऐश्वर्याची प्राप्ति झाल्यामुळें तिन्ही लोकांच्या वैभवाला मीं मागें सारीत होतें ! पण शेवटीं तसा अभिमान बाळगणाऱ्या मला तो श्रीकृष्ण सोडून गेला ! ॥ ३३ ॥

स्वतःच्या तंत्रानेंच वागणारा असा तो श्रीकृष्ण आहे. मला अतिशय त्रासदायक झालेल्या दैत्यराजांचें शेंकडो अक्षौहिणी सैन्य त्यानें नष्ट केलें, आणि हे धर्मा ! तीन पाय कमी झाल्यामुळें दुःखित झालेल्या तुझें स्वरूप, तुला पराक्रमानें प्राप्त करून द्यावें म्हणून त्यानें यादवकुळांत अवतार घेऊन मोहक शरीर धारण केलें ॥ ३४ ॥

प्रेमकटाक्ष, रमणीय हास्य, मधुर भाषण, इत्यादिकांच्या योगानें त्यानें मधुकुलांतील स्त्रियांचा अभिमान नाहींसा करून त्यांचें चित्त इतर विषयांच्या ठिकाणीं अस्थिर करून टाकलें; त्याच्या चरणाचे ठसे माझ्या अंगावर उमटतांच त्यावर रोमांच उभे राहात; अशा त्या पुरुषश्रेष्ठ श्रीकृष्णाचा वियोग कोणत्या स्त्रीला सहन करतां येईल बरें ? ॥ ३५ ॥

याप्रमाणें भूमाता आणि धर्म यांचा परस्पर संवाद चालला असतां राजर्षि परीक्षित् पूर्ववाहिनी सरस्वतीच्या कांठीं येऊन पोंचला ॥ ३६ ॥

**सोळावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १७ वा

तेव्हां त्या ठिकाणीं राजचिन्हें धारण केलेला एक शूद्र हातांत दांडकें घेऊन अनाथाप्रमाणें असणाऱ्या एका गायबैलांच्या जोडीला हाणीत आहे असें परीक्षित्‌राजाला आढळलें ॥ १ ॥

बैल भीतीनें कांपत कांपत मुतत होता व तशा खिन्न स्थितींत त्याला तो शूद्र लाथा मारीत होता. ती कामधेनु वत्सरहित व कृश असून दीनपणानें डोळ्यांतून आसवें गाळीत होती आणि खावयाला गवत मिळेल काय म्हणून पाहत होती; पण तो शूद्र तिला एकसारखें पायानें ताडन करीत होता. परीक्षित्‌राजा त्या वेळीं सोन्यानें मढविलेल्या रथांत बसला होता. हा प्रकार पाहून त्यानें धनुष्यावर दोरी चढविली आणि मेघाप्रमाणें गंभीर शब्दानें तो त्या शूद्राला विचारूं लागला ॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥

मी या लोकांचें रक्षण करीत असतां आपल्या शक्तीच्या अभिमानानें दुर्बळांना तूं ताडन करीत आहेस, तर असा तूं आहेस तरी कोण ? नाटक्याप्रमाणें तुझा वेश तर राजाचा आहे; पण कृति पहावी तर ती मात्र शूद्राची ! ॥ ५ ॥

तूं कोण आहेस बोल ! श्रीकृष्ण परमात्मा अर्जुनासह निजधामाला गेलेला पाहून तूं निरपराध्यांना असा एकीकडे गांठून छळीत आहेस; या अपराधामुळें तूं खचित वधास पात्र झाला आहेस ॥ ६ ॥

नंतर परीक्षित् धर्माकडे वळून म्हणाला, तूं कमलतंतूप्रमाणें शुभ्र वर्णाचा आहेस; तुझे तीन पाय नष्ट होऊन एकाच पायानें तूं चालत आहेस. अशा स्थितींत बैलाच्या रूपानें चालणाऱ्या तुला पाहून आम्हांला मोठा खेद वाटतो, तूं कोणी देव आहेस काय ? ॥७॥

पुरुकुलांतील राजांचे बाहु या पृथ्वीतलाचें रक्षण करीत असतां तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणत्याहि प्राण्यावर अशी आपत्ति आलेली दिसत नाहीं ॥ ८ ॥

हे कामधेनुपुत्रा ! तूं शोक करूं नकोस. शूद्रापासून तुला प्राप्त झालेलें भय आतांच दूर होईल. हे गोमाते ! तूंहि रडूं नकोस. मीं दुष्टांचें पारिपत्य करणारा आहें. तुझें कल्याण असो ! ॥ ९ ॥

हे सदाचारिणी गोमाते ! ज्या राजाच्या देशांत दुष्टांकडून साऱ्या प्रजांना उपद्रव पोंचतो, त्या उन्मत्त राजाचें यश, आयुष्य, ऐश्वर्य आणि मोक्षसाधनें या सर्वांचा नाश होत असतो ॥ १० ॥

गांजलेल्या दुःखाचें निवारण करणें हाच खरोखर राजांचा श्रेष्ठ धर्म होय. यास्तव प्राण्यांना पीडा देणाऱ्या या अत्यंत दुष्ट अशा पाप्याचा मी वध करतों ! ॥ ११ ॥

हे कामधेनुपुत्रा ! तुला चार पाय वास्तविक होते ना ? तुझे तीन पाय कोणीं तोडले ? श्रीकृष्णाच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या राजांच्या राज्यांत तुझ्यासारखी आपत्ति कोणावरच न येवो ! ॥ १२ ॥

हे वृषभा ! निरपराधी व सदाचरणी अशा तुझें कल्याण असो ! तुझ्या अंगांना विरूप करून पांडवांच्या कीर्तीला कलंक लावणारा अधम कोण, त्याचें नांव मला सांग ! ॥ १३ ॥

निरपराधी लोकांशीं असें दुष्ट आचरण करणाऱ्या त्याला माझ्याकडून सर्व प्रकारें शासन झालेंच पाहिजे; कारण दुष्टांचा नाश करावा तेंव्हांच सज्जनांचें कल्याण होईल ॥ १४ ॥

कोणत्याहि प्रकारचें नियंत्रण न मानतां जो कोणी येथें निरपराधी प्राणिमात्रांना पीडा देईल तो प्रत्यक्ष देव जरी असला तरी बाहुभूषणांनीं अलंकृत असलेला त्याचाहि बाहू मीं तोडून टाकीन ! ॥ १५ ॥

कारण कोणत्याहि प्रकारची आपत्ति प्राप्त झाली नसतांहि जे विहित मार्ग सोडून वाममार्गानें जातात, अशा लोकांना शास्त्रनियमानुसार दंड करणाऱ्या राजाचें मोठें कर्तव्य म्हणजे जे स्वधर्मानें चालणारे आहेत त्यांचें रक्षण करणें हेंच होय ! ॥ १६ ॥

धर्मानें उत्तर दिलें — राजा ! पांडवकुलांत जन्म घेतलेल्या तुम्हीं पीडितांना अभय-वचन द्यावें हें योग्यच आहे. अशाच त्यांच्या गुणांमुळेंच भगवान् श्रीकृष्णालाहि त्या पांडवांचीं दूतासारखीं सेवकांचीं कामें करण्यांत भूषण वाटलें ॥ १७ ॥

हे पुरुषश्रेष्ठा ! आम्हांला पीडा होण्याचीं कारणें अनेकजण अनेक तऱ्हेचीं सांगतात. त्यामुळें आम्हीं एका प्रकारें मूढ होऊन पीडा उत्पन्न करणारा पुरुष कोण हें आम्हांला कळत नाहीं ॥ १८ ॥

नाना प्रकारच्या विरोधी कल्पनांत गुरफटलेले कित्येक लोक आपल्या सुखदुःखाला आपणच कारण आहों असें म्हणतात; दुसरे कांहीं दैव हें त्याचें कारण समजतात, तिसरे आणखी कर्म हें सुखदुःखाचें कारण मानतात; तसेंच इतर कोणी निसर्गाला तर कोणी परमेश्वरालाहि आपल्या दुःखाचें कारण मानतात ॥ १९ ॥

कल्पनेनें जाणतां येणार नाहींत किंवा बोटांनीं दाखवितां येणार नाहींत अशा कोणत्या तरी कारणांपासूनच सुखदुःखादि उत्पन्न होतात असा माझा निश्चय आहे; करितां हे परीक्षित्‌राजा ! मला दुःख देणारा कोण आहे, याचा निर्णय तूच मनाशी योग्य विचार करून कर ! ॥ २० ॥

हे ब्राह्मणश्रेष्ठा शौनका ! याप्रमाणें वृषभरूपधारी धर्मानें उत्तर दिलें असतां सार्वभौम परीक्षिताच्या मनांतील सर्व दुःख नाहींसें झालें आणि धर्माला त्यानें पुनः विचारलें ॥ २१ ॥

हे धर्म जाणणाऱ्या वृषभा ! तूं धर्मशास्त्राला धरून बोलत आहेस, त्यापेक्षां वृषभाचें रूप घेतलेला तूं मूर्तिमान् धर्मच आहेस. अधर्म करणाराचें नांव तूं सुचवीत नाहींस, यावरून अधर्म करणाराला जी वाईट गति मिळते तीच त्याचें नांव सुचविणारासहि मिळते ही गोष्ट तूं जाणत आहेस ।। २२ ।।

किंवा खरोखर विचार करून पाहिलें असतां परमेश्वराच्या मायेची गति जाणणें हें मनाच्या आणि वाणीच्या सामर्थ्याबाहेर आहे असाच निश्चय होतो ।। २३ ।।

तपश्चर्या, शुद्धता, दया व सत्य भाषण हे तुझे पाय होत. अधर्मांचे अंशावतार जे गर्व, विषयासक्ति व उन्मत्तपणा हे दुर्गुण त्यांनीं तुझे तीन[१] पाय मोडून टाकले ।। २४ ।।

हे धर्मा ! आतां हा उरलेला तुझा जो चौथा पाय सत्य, त्याच्याच बळावर तुझें जीवित अवलंबून आहे; पण त्यालाहि असत्यावर पोसलेला हा अधर्मरूप कलि धरून मोडूं पाहत आहे ।। २५ ।।

भगवान् श्रीकृष्णानें या पृथ्वीचा मोठा भार नाहींसा केला आणि त्याच्या रमणीय पदचिन्हांनीं ती एखाद्या साध्वी स्त्रीप्रमाणें शोभायमान झाली होती; पण आतां श्रीकृष्णानें हिचा त्याग केल्यामुळें विधवेप्रमाणें तिची दुःखी स्थिति झाली आहे आणि ब्राह्मणांचा नाश करूं पाहाणारे शूद्र राजवेषानें आपला उपभोग घेतील अशी तिला भीति उत्पन्न झाल्यामुळें ती डोळ्यांतून अश्रु गाळून शोक करीत आहे ।। २६ ।। २७ ।।

महारथी परीक्षितानें ह्याप्रमाणें धर्माचें आणि पृथ्वीचें शांतवन करून अधर्माच्या प्रवृत्तीला कारणीभूत झालेल्या त्या कलीला मारण्याकरितां आपल्या तीक्ष्ण तरवारीला हात घातला ।। २८ ।।

तेव्हां राजा आपल्याला मारणार असें पाहून कलीनें आपलीं राजचिन्हें टाकून दिलीं आणि भीतीनें घाबरून गेल्यामुळें तो परीक्षिताच्या पायांवर डोकें ठेवून त्याला शरण गेला ।। २९ ।।

तेव्हां दीनावर दया करणारा व शरण आलेल्याचें रक्षण करणारा तो कीर्तिमान् परीक्षित राजा, कलि आपल्या पायां पडून आपल्याला शरण आला आहे असें पाहून त्याला न मारितां हंसत हंसतच त्याला म्हणाला ।। ३० ।।

हे कले ! अर्जुनाची कीर्ति गाणाऱ्या आमच्या पुढें हात जोडून उभ्या राहिलेल्या तुला खरोखर भिण्याचें मुळींच कारण नाहीं. तथापि ह्यानंतर तूं माझ्या राज्यांत मुळीं सुद्धां रहातां कामा नयेस; कारण अधर्माचा तूं मोठा भोक्ता आहेस ।। ३१ ।।

राजे लोकांच्या शरिरांत तूं राहूं लागल्याबरोबर लोभ, खोटेपणा, चोरी, क्षुद्रपणा, पाप, अवदशा, कपट, भांडण आणि दंभ ह्या सर्व अधार्मिक गोष्टींची मालिकाच सुरू झाली ।। ३२ ।।

---

१ तप, शुद्धि आणि दया

म्हणून अधर्माला उत्तेजन देणाऱ्या हे कले, धर्मानें व सत्यानेंच जेथें वागावयाचें अशा या ब्रह्मावर्तक्षेत्रांत तूं मुळींच राहूं नकोस; येथें यज्ञाच्या संपूर्ण विधी जाणणारे याज्ञिक लोक अनेक प्रकारचे यज्ञ करून श्रीकृष्णाचें पूजन करीत असतात ॥ ३३ ॥

त्या ब्रह्मावर्तक्षेत्रांत सर्वगुणसंपन्न यज्ञस्वरूपी श्रीकृष्णाचें पूजन होतें. सर्व स्थावर-जंगमांत वायूप्रमाणें व्यापणारा तो हा श्रीकृष्ण परमेश्वर यज्ञ करणाऱ्या लोकांचें कल्याण करून त्यांच्या कोणत्याहि इच्छा विफल होणार नाहींत असें करतो ॥ ३४ ॥

सूत म्हणतात—परीक्षित् राजानें याप्रमाणें आज्ञा दिली असतां कलि कांपूं लागला आणि दंडधारी यमाप्रमाणें हातांत तरवार धरून शिक्षा करण्यास तयार झालेल्या त्या राजाला तो म्हणाला—॥ ३५ ॥

हे सार्वभौम परीक्षित् राजा ! तुझ्या आज्ञेनें कोठेंहि मी राहीन; पण तेथें सुद्धां हातांत धनुष्यबाण घेतलेला तूं मला दिसणारच ! ॥ ३६ ॥

हे राजा ! धार्मिक पुरुषांत तूं श्रेष्ठ आहेस. यास्तव तुझ्या आज्ञेप्रमाणें व तूं घातलेल्या नियमाप्रमाणें जेथें मला राहतां येईल असें एखादें ठिकाण तूंच मला दाखविल्यास बरें होईल ॥ ३७ ॥

सूत म्हणाले:—जेव्हां कलीनें राजाची अशी प्रार्थना केली, तेव्हां परीक्षित्-राजानें त्याला राहण्याकरितां ‘ जुगार खेळणें, दारू पिणें, स्त्रियांच्या संबंधीं क्षुद्र व्यवहार व हिंसा ’ हीं चार प्रकारचीं दुष्कृत्यें जेथें चालतात अशीं ठिकाणें नेमून दिलीं ॥ ३८ ॥

नंतर कलीनें आणखी प्रार्थना केल्यावरून, सोनें, तसेंच मिथ्या भाषण, उन्माद, इच्छा, हिंसादि दोष व शत्रुत्व हीं पांच स्थानें देखील परीक्षितानें त्याला दिलीं ॥ ३९ ॥

तेव्हां अधर्माचा उगम असा तो कलि, परीक्षित् राजाच्या आज्ञेप्रमाणें वागण्यासाठीं त्यानें दिलेल्या या पांच स्थानांत राहूं लागला ॥ ४० ॥

ह्याकरितां उत्कर्षाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें, विशेषेंकरून धार्मिक राजानें तसेंच लोकरक्षक गुरूनें, ह्यांशीं कधींहि संबंध ठेवूं नये ॥ ४१ ॥

परीक्षित् राजानें नंतर वृषभस्वरूपी धर्माला तपश्चर्या, शुद्धता व दया हे तीन पाय जोडून दिले आणि गोरूपी पृथ्वीलाहि आश्वासन देऊन तिचा उत्कर्ष केला ॥ ४२ ॥

हल्लीं तो हा परीक्षित् राजा, अरण्याला जाण्यास निघालेला आपला आजोबा जो धर्मराज, त्यानें दिलेल्या सिंहासनावर आरूढ झालेला आहे ॥ ४३ ॥

कुरुकुलांतील राजांच्या ऐश्वर्यानें शोभणारा असा तो सार्वभौम कीर्तिमान् भाग्य-शाली राजर्षि परीक्षित् सांप्रत हस्तिनापुरांत राहत आहे ॥ ४४ ॥

ह्या अभिमन्युपुत्र परीक्षित्राजाचा प्रभाव अशा प्रकारचा आहे. तो राज्याचें रक्षण करीत आहे आणि त्यामुळेंच तुम्हांला यज्ञाची दीक्षा घेतां आली आहे ॥ ४५ ॥

**सतरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय १८ वा

सूत म्हणाला—शौनक हो ! मातेच्या उदरांत अश्वत्थाम्याच्या अस्त्रानें परीक्षित्‌-राजा जरी होरपळला होता, तरी अद्‌भुत सामर्थ्यवान्‌ अशा भगवान्‌ श्रीकृष्णाच्या कृपेनें तो जिवंत राहिला. त्यानें आपलें अंतःकरण श्रीकृष्णाला अर्पण केलें आणि त्यामुळें ब्राह्मणाच्या कोपानें प्रेरित झालेल्या तक्षकनागानें त्याच्या प्राणांवर जरी महासंकट आणलें, तरी त्याचें चित्त भयानें व्याकुळ झालें नाहीं. व्यासपुत्र जे शुकाचार्य त्यांचा तो शिष्य झाला आणि त्यांच्यापासून भगवान्‌ श्रीकृष्णाविषयींचें ज्ञान प्राप्त करून घेतल्यावर सर्व विषयांवरील प्रेम सोडून त्यानें आपलें शरीर गंगेंत टाकून दिलें ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

कारण भगवंताच्या अमृतासारख्या मधुर कथांचें सेवन करणाऱ्या आणि त्याच्या चरणकमलाचें स्मरण करणाऱ्या व त्याचें यशोगायन करणाऱ्या भक्तांना मृत्युसमयीं देखील कोणत्याहि प्रकारचा भ्रम पडत नाहीं ॥ ४ ॥

जोंपर्यंत अभिमन्युपुत्र महापराक्रमी परीक्षित्‌, पृथ्वीचा सार्वभौम राजा म्हणून वागत होता, तोंपर्यंत कलीचा प्रवेश सर्वत्र जरी झाला तरी त्याची सत्ता मात्र चालली नाहीं ॥ ५ ॥

खरें म्हटलें तर, ज्या दिवशीं आणि ज्या क्षणीं भगवान्‌ श्रीकृष्णानें या पृथ्वीतलाचा त्याग केला, त्याच दिवशीं व त्याच वेळीं अधर्माचा उगम अशा त्या कलीला येथें सुरुवात झाली होती ॥ ६ ॥

सम्राट्‌ परीक्षित्‌, भ्रमराप्रमाणें सार तेवढें ग्रहण करणारा होता, त्यामुळें त्यानें कलीचा सुद्धां द्वेष केला नाहीं, कारण कलीचा असा गुण[१] आहे कीं, त्याच्या सत्तेंत केवळ पुण्यकृत्यांच्या संकल्पानेंहि फलप्राप्ति होते; पण पापकृत्यांचें तसें नसून तीं प्रत्यक्ष हातून घडतील तरच त्यांचा परिणाम भोगावा लागतो ॥ ७ ॥

अज्ञानी लोकांवर मात्र आपला पराक्रम गाजविणारा, पण ज्ञान्याशीं गांठ पडली असतां भेदरून जाणारा हा कलि खरोखर करूं शकेल तरी काय ? केवळ असावध असणाऱ्या लोकांवर मात्र स्वतः तो सावध राहून लांडग्याप्रमाणें झडप घालतो. ( याकरितां त्याची वास्तविक भीति बाळगण्याचें कारण नाहीं ) ॥ ८ ॥

---

१ कलीचा आणखीहि एक गुण सांगितला आहे तो असा—

“ **कलेर्दोषनिधे राजन्नस्ति ह्येको महान्गुणः । कीर्तनादेव कृष्णस्य मुक्तसङ्गः परं व्रजेत्‌** ” कलीमध्यें जरी सर्व दोष भरलेले आहेत तरी त्यांत एक गुण आहे कीं, पूर्वयुगांत तपश्चर्या, यज्ञयाग इत्यादि कष्टांनीं जो मोक्ष मिळत नसे तो मोक्ष कलियुगांत भगवन्नामाच्या कीर्तनानेंच मिळतो.

असो. तुम्हीं मला विचारल्याप्रमाणें श्रीकृष्णाच्या कथांनीं युक्त असें हें परीक्षित् राजाचें पवित्र चरित्र मीं तुम्हांला सांगितलें ॥ ९ ॥

श्रीकृष्णाचीं महाकृत्यें सारींच वर्णनीय आहेत. यास्तव ज्या पुरुषांना उत्कर्षाची इच्छा असेल त्यांनी ज्या ज्या कथांना भगवंताच्या गुणांचा आणि पराक्रमाचा आधार आहे त्या त्या सगळ्या अवश्य श्रवण कराव्या ॥ १० ॥

ही कथा ऐकून शौनकादि ऋषि सूताला म्हणाले—हे सूता ! तुला दीर्घ आयुष्य असो. कारण आम्हीं मृत्यूनें ग्रस्त होणाऱ्यापैकींच आहोंत; पण त्या आम्हांला अमृतासारखें लागणारें श्रीकृष्णाच्या शुद्ध यशाचें वर्णन तूं शांतपणें करीत आहेस ! ॥ ११ ॥

हे सूता, आमच्या या यज्ञरूप कर्मांच्या फलाविषयीं आम्हांला विश्वास नाहीं. त्यांत आमचीं शरीरें धुरानें धुरकटून जात आहेत एवढें खरें. अशा स्थितींत तूं आम्हांला श्रीकृष्णाच्या चरणकमलांतील मधुर रस आकंठ पाजीत आहेस [ हे तुझे आमच्यावर केवढे उपकार आहेत ! ] ॥ १२ ॥

श्रीकृष्णभक्तांच्या संगतीची योग्यता फारच थोर आहे. स्वर्गसुख किंबहुना मोक्षसुख देखील तिच्या पासंगालाहि पुरणार नाहीं; मग माणसांना प्रिय वाटणाऱ्या भोग्य विषयांची तिच्यापुढें कथा काय ? ॥ १३ ॥

श्रीकृष्ण सत्त्वादि गुणांनीं सर्वथैव अलिप्त असून श्रेष्ठांत श्रेष्ठ अशाहि पुरुषांचा तोच सर्वस्वीं आधार आहे. त्याच्या कथा ऐकून कोणत्या रसिकाची तृप्ति होईल बरें ? कारण शंकर, ब्रह्मदेव आदिकरून महायोग्यांना देखील त्याच्या गुणांचा ठाव लागलेला नाहीं ॥ १४ ॥

हे विद्वान सूता ! खरोखर श्रीकृष्णाला तूं सर्वस्व मानीत आहेस. अत्यंत श्रेष्ठ पुरुषांनाहि तोच ध्येयरूप आहे. त्याचें निर्मळ व उदार चरित्र ऐकण्याची आम्हांला इच्छा असल्यामुळें तें तूं आम्हांला विस्तारानें सांग ॥ १५ ॥

परीक्षित् राजा थोर बुद्धीचा व मोठा भगवद्भक्त खरा. कारण व्यासपुत्र शुकाचार्यांनीं सांगितलेल्या ज्ञानाच्या योगानें गरुडध्वज अशा परमेश्वराच्या मोक्ष[१] नांवानें प्रसिद्ध असलेल्या पादतलाची त्यानें प्राप्ति करून घेतली ॥ १६ ॥

परीक्षित्राजाचें तें चरित्र फार पवित्र असून त्याचा शेवट अतिशय अद्भुत अशा योगाच्या प्रकारानें झालेला आहे. तें भगवद्भक्तांना[२] अत्यंत रमणीय वाटतें. यास्तव त्यांतील अर्थ अगदीं स्पष्ट होईल अशा रीतीनें तें तूं आम्हांला सांग ॥ १७ ॥

---

१ मोक्ष म्हणून जो म्हणतात, तो भगवंताच्या पायांजवळ वास करण्याचा अधिकार हाच होय, असा भावार्थ.

२ भागवताभिराम म्हणजे भागवत ग्रंथामुळें रमणीय झालेले, असाहि अर्थ कोणी करतात.

सूत म्हणाला—हे शौनक ऋषि हो ! माझा जन्म विलोम[१] विवाहापासून झालेला असला तरी आज तुमच्यासारख्या वृद्धांची सेवा घडल्यामुळें त्याचें साफल्य झालें आहे. कारण श्रेष्ठ पुरुषांशीं संभाषण करण्याचा प्रसंग येणें ही गोष्ट हीनकुळांत जन्म झाल्याचें दुःख तत्काळ नाहींसें करणारी आहे ॥ १८ ॥

मग त्या श्रेष्ठांतील श्रेष्ठांनाहि सर्वस्वी आधारभूत असलेल्या श्रीकृष्णाचें नामगायन करणाऱ्याच्या दुःखाचें निरसन होईल हें काय सांगावयास पाहिजे ? कारण त्या भगवंताची शक्ति अनंत व त्याचे गुणहि अपरिमित आहेत आणि म्हणूनच त्याला अनंत असें नांव मिळालें आहे ॥ १९ ॥

कोणालाहि भगवंताशीं गुणांनीं बरोबरीहि करतां यावयाची नाहीं; मग वरचढपणाची गोष्ट तरी कशाला ? प्रत्यक्ष लक्ष्मीनें सुद्धां आपली प्रार्थना करणाऱ्या इतरांना झिडकारून आपली मुळींच इच्छा न करणाऱ्या त्या भगवंताच्या पायांच्या धुळीचेंच सेवन केलें, एवढें सांगितलें म्हणजे पुरे ॥ २० ॥

आणखी असें कीं, त्या श्रीकृष्णपरमात्म्याच्या नखापासून उत्पन्न झालेलें आणि ब्रह्मदेवानें त्याच्याच पूजेसाठीं स्वीकारलेलें गंगेचें उदक, शंकरासह सर्व जगाला पवित्र करीत आहे. तेव्हां भगवान् ही संज्ञा, या लोकांत त्या श्रीकृष्णाहून दुसऱ्या कोणाला अधिक सार्थकतेनें लागणार बरें ? ॥ २१ ॥

त्या परमात्म्यावर प्रेम करणारे ज्ञानी पुरुष देहादिक वस्तूंवर उत्पन्न झालेली आपली आसक्ति दूर करून एकदमच त्या शेवटच्या परमहंस पदवीला जाऊन पोंचतात आणि तेथें अहिंसा आणि शांति यांचा स्वधर्म म्हणून स्वीकार करतात ॥ २२ ॥

हे तेजस्वी शौनकादि ऋषि हो, तुम्हीं मला जे प्रश्न विचारलेत, त्यांचीं उत्तरें माझ्या ज्ञानाची जितकी मर्यादा आहे तेथपर्यंतच मीं तुम्हांला देईन. पक्षी ज्याप्रमाणें अनंत आकाशांत आपल्या शक्तीच्या मर्यादेंतच उडतात, त्याप्रमाणें परमेश्वराच्या अनंत लीला, ज्ञानी झाले तरी आपल्या शक्तीप्रमाणेंच वर्णन करतात ॥ २३ ॥

एके दिवशीं धनुष्य सज्ज करून मृगया करींत असतां परीक्षित्‌राजा हरिणांच्या मागें लागून थकला आणि त्याला फार भूक व तहान लागली. तेव्हां जवळ कोठें पाण्याचा संचय न दिसल्यामुळें तो एका आश्रमांत शिरला, तों तेथें डोळे मिटून शांतपणें बसलेला एक ऋषि त्याच्या दृष्टीस पडला ॥ २४ ॥ २५ ॥

---

१ संकरजाति दोन प्रकारची आहे. एक अनुलोम व दुसरी प्रतिलोम अथवा विलोम. ब्राह्मणापासून क्षत्रिय-स्त्री, वैश्य-स्त्री वगैरे ठिकाणीं किंवा क्षत्रियापासून वैश्य-स्त्री, शूद्र-स्त्री वगैरे ठिकाणीं झालेल्या संततीला अनुलोम म्हणतात. त्याच्या उलट शूद्रापासून ब्राह्मण-स्त्री, क्षत्रिय-स्त्री किंवा वैश्य-स्त्रीचे ठिकाणीं किंवा वैश्यापासून ब्राह्मण-स्त्री अगर क्षत्रिय-स्त्रीचे ठिकाणीं अथवा क्षत्रियापासून ब्राह्मण-स्त्रीचे ठिकाणीं झालेल्या संततीला प्रतिलोम किंवा विलोम म्हणतात. सूत ही जाति क्षत्रियापासून ब्राह्मण-स्त्रीचे ठिकाणीं झालेली संतति होय.

त्या ऋषीनें इंद्रियांचें दमन करून प्राणांचा अवरोध केला होता आणि मन व बुद्धि यांचेंहि नियमन केलें होतें. जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन[1] अवस्था उलटून तो पलीकडे तुर्यावस्थेंत गेलेला असल्यामुळें निर्विकार ब्रह्मरूप झाला होता. त्याचें शरीर विस्कळित झालेल्या जटांनीं आच्छादिलेलें होतें व त्यानें रुरुनामक हरिणाचें कातडें पांघरलेलें होतें. अशा स्वरूपाच्या त्या ऋषीला पाहून परीक्षित्‌राजाचा घसा कोरडा पडल्यामुळें त्याच्यापाशीं तो पाणी प्यावयास मागूं लागला ॥ २६ ॥ २७ ॥

पण त्याला गवताचें[2] म्हणा, भूमीचें म्हणा, कसलेंहि आसन मिळालें नाहीं आणि कोणत्याहि प्रकारचा सत्कार किंवा गोड भाषण हीं त्याला प्राप्त झालीं नाहींत. तेव्हां आपला येथें अपमान झाला असें वाटून त्याला राग आला ॥ २८ ॥

हे शौनक ऋषी हो, भूक आणि तहान यांनीं परीक्षित्‌राजाचे प्राण व्याकुळ झाल्यामुळें त्याला ऋषीसंबंधानें एकाएकीं मोठा मत्सर आणि क्रोध उत्पन्न झाला. पूर्वी हे विकार त्याच्या मनांत कधींहि असे आले नव्हते ॥ २९ ॥

त्या विकारांच्या आवेशांत आश्रमांतून बाहेर येतां येतां त्या राजानें त्या ब्रह्मर्षीच्या खांद्यावर एक मेलेला सर्प धनुष्याच्या टोकानें उचलून टाकला आणि तो आपल्या नगरांत निघून गेला ॥ ३० ॥

त्याला शंका आली कीं, या मुनीनें खरोखरच सर्व इंद्रियांचा निरोध केला आहे, कीं क्षुद्र क्षत्रियांकडून आमचें काय चांगलें किंवा वाईट होणार आहे, असें म्हणून केवळ समाधीचें ढोंग केलें आहे ! ॥ ३१ ॥

राजा निघून गेल्यावर त्या ऋषीचा अत्यंत तेजस्वी पुत्र, इतर मुलांसह खेळत होता, त्याला राजानें केलेली आपल्या पित्याची आगळीक समजतांच तो म्हणाला–॥ ३२॥

अहो, केवढा हो या राजाचा अधर्म, बळि भक्षण करून लठ्ठ झालेल्या कावळ्या कुत्र्याप्रमाणें त्याचें कृत्य आहे. द्वाररक्षक अशा सेवकांनीं आपल्या स्वामीविषयीं दुष्टबुद्धि धरावी, अशांतलाच हा प्रकार नव्हे काय ? ॥ ३३ ॥

---

१ त्या तीन अवस्था म्हणजे जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति ह्या होत. ज्या अवस्थेंत राहून आपण ह्या दृश्य स्थूल देहानें सर्व व्यवहार करतों, तिला जाग्रदावस्था म्हणतात. अर्धवट झोंपेंत सर्व इंद्रियें मनांत लीन करून लिंगदेहानें सर्वत्र फिरून जींत सुखदुःखादि अनुभवितों तिला स्वप्नावस्था म्हणतात व लिंगदेहहि मनासह आत्म्यांत लीन करून जी गाढ झोंप लागते, तिला सुषुप्ति म्हणतात. चौथी जी तुर्यावस्था, मुक्तावस्था किंवा ब्रह्मानन्दावस्था ती फक्त योग्यालाच अनुभवितां येते.

२ “ **तृणानि भूमिरुदकं वाक्चतुर्थी च सूनृता ॥ एतान्यपि सतां गेहे नोच्छिद्यन्ते कदाचन ॥** ” गवत, जमीन, पाणी व गोड भाषण, हे चार प्रकार सज्जन आपल्या घरांतून कधींही नाहींसे करीत नाहींत. पूर्वी हे चार पदार्थ प्रत्येकास सहज हवे तितके मिळत असत; परंतु तेहि कालगतीनें सांप्रत दुर्लभ झाले आहेत.

खरोखर पाहिलें तर क्षुद्र क्षत्रिय राजा म्हणजे ब्राह्मणांनीं दरवाज्यावर रक्षणासाठीं नेमिलेला सेवक होय ! दरवाजाजवळ राहून स्वामीच्या घरांतील सारें भांडवलच खाऊन टाकणें त्याला कसें योग्य होईल ? ॥ ३४ ॥

वास्तव, दुर्मार्गानें जाणाऱ्यांना शासन करणारा भगवान् श्रीकृष्ण निजधामाला गेला असल्यामुळें आज धर्ममर्यादांचें उल्लंघन करणाऱ्याला मीच स्वतः शासन करतों. माझें सामर्थ्य पाहा ! ॥ ३५ ॥

याप्रमाणें रागानें डोळे लाल झालेल्या त्या ऋषिपुत्रानें आपल्या बरोबरीच्या ऋषि-बालकांना सांगून कौशिकीनदीचें उदक हातांत घेतलें आणि खरोखरच वज्राप्रमाणें तीक्ष्ण अशा शापशब्दांचा उच्चार केला ॥ ३६ ॥

तो म्हणाला, ' ज्यानें धर्ममर्यादेचें उल्लंघन करून स्वतःच्या कुळाला बट्टा लावला आणि माझ्या पित्याचा द्रोह केला, त्याला आजपासून सातवे दिवशीं मीं प्रेरणा केलेला तक्षकनाग दंश करील !' ॥ ३७ ॥

नंतर तो मुनिपुत्र तेथून आश्रमांत आला व आपल्या पित्याच्या गळ्यांत मृत सर्प लोंबकळत असलेला पाहून त्याला फार दुःख झालें आणि तो गळा काढून मोठ्यानें रडूं लागला ॥ ३८ ॥

सूत म्हणतात—शौनक हो, मुलाचा विलाप ऐकून त्या अंगिरसकुलोत्पन्न ऋषीनें हळूहळू आपले डोळे उघडले आणि पाहतो तों आपल्या खांद्यावरून मृत सर्प लटकतो आहे ! मग तो सर्प काढून टाकून तो पुत्राला म्हणाला, ' बाळा, कां रे रडतोस ? तुला कोणी ताडन केलें किंवा कठोर शब्द बोललें काय ? ' पित्याचा तो प्रश्न ऐकून मुनिपुत्रानें झालेला सर्व वृत्तांत त्याला सांगितला ॥ ३९ ॥ ४० ॥

तेव्हां त्या शापाला सर्वस्वीं अयोग्य असलेल्या अशा परीक्षित्राजाला आपल्या मुलानें शाप दिला, असें ऐकून मुलाच्या कृतीबद्दल त्याला वाईट वाटलें आणि तो त्यला म्हणाला, ' अरे किती रे तूं वेडा ! तुझ्या हातून आज केवढें मोठें पाप घडलें ! एवढ्या लहानशा अपराधाबद्दल केवढा मोठा दंड तूं केलास ! ' ॥ ४१ ॥

हे पुत्रा, खरोखर तुझी बुद्धि किती अपक्व ! श्रेष्ठ पदवीच्या राजाला सामान्य माणसासारखें मानणें तुला योग्य नव्हतें. शत्रूंना असह्य अशा त्याच्या तेजामुळें प्रजेचें संरक्षण होत असून तिला निर्भयपणा वाटतो आणि सर्व सुखें प्राप्त होतात ॥ ४२ ॥

मुला, राजा जो म्हणतात तो चक्रपाणि विष्णुच होय. तो जर पृथ्वीवरून नाहींसा होईल, तर लोकांचें रक्षण होणें बंद होऊन चोरांचा सर्वत्र सुळसुळाट होईल आणि मग रक्षक नसलेल्या मेंढ्यांच्या कळपाप्रमाणें समाज तत्काळ नाश पावेल ॥ ४३ ॥

द्रव्याचा स्वामी नाहींसा झाला असतां तें लुटून नेणारा जें पाप करतो, तेंच पाप आमचा कांहीं संबंध नसतां आज आमच्या अंगीं लागणार ! लोकांमध्यें आतां पुष्कळ चोरांचा उद्भव होऊन ते एकमेकांत मारामारी करतील, अपशब्द बोलतील आणि स्त्रिया आणि द्रव्य यांचें हरण करतील ॥ ४४ ॥

मग चार वर्ण आणि चार आश्रम यांनीं युक्त असा तीन वेदांवर उभारलेला आर्य धर्म नष्ट होईल आणि मनुष्याचें मन द्रव्यप्राप्ति आणि विषयोपभोग यांतच दंग होईल आणि त्यामुळें कुत्र्या-वानरांप्रमाणें मनुष्यांतहि वर्णाचें मिश्रण होऊन जाईल ॥ ४५ ॥

अरे, तो सार्वभौम राजा धर्माचें रक्षण करणारा आणि मोठा कीर्तिमान् असून श्रीकृष्णाचा मोठा भक्त आहे. तो राजांत श्रेष्ठ असून त्यानें कित्येक अश्वमेध केले आहेत. क्षुधा, तृषा आणि श्रम यांनीं व्याकुळ होऊन तो बिचारा येथें आला होता; आमच्या शापाला तो मुळींच पात्र नाहीं ! ॥ ४६ ॥

अपक्वबुद्धीच्या बालकाकडून निष्पाप अशा भक्तांचा जो हा अपराध घडाला आहे, त्याबद्दल सर्वांच्या अंतर्यामीं राहणारा तो परमेश्वर आम्हांला क्षमा करो ! ॥ ४७ ॥

भगवद्भक्तांचा कोणी तिरस्कार करो, कोणी त्यांना फसवो, कोणी शाप देवो, कोणी निंदा करो कीं ताडन करो, प्रतिकार करण्याचें सामर्थ्य असूनहि ते ( भगवद्भक्त ) अपकारांचा प्रतिकार कधींच करीत नाहींत ॥ ४८ ॥

या प्रकारें मुलानें केलेल्या दुष्कृतीचा त्या महामुनीला मोठा पश्चात्ताप झाला आणि स्वतःचा अपराध राजानें केलेला असतांहि तो त्यानें मनांतहि आणला नाहीं ॥ ४९ ॥

कारण जे सत्पुरुष आहेत ते इतरांकडून त्रास झाला असतांहि बहुधा दुःखित होत नाहींत किंवा सुख झालें असतां आनंदित होत नाहींत, कारण आत्मा हा त्रिगुणांपासून सर्वथा अलिप्त आहे ( असा त्यांचा निश्चय असतो ) ॥ ५० ॥

## अठरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १९ वा

सूत म्हणतात—हे शौनकऋषीहो, नंतर आपल्याकडून झालेल्या त्या निन्द्य कृत्याचा विचार मनांत वारंवार आल्यामुळें परीक्षित्‌राजाचें अंतःकरण खिन्न झालें आणि तो मनांत म्हणाला, ' अहो, ज्याच्यामध्यें ब्रह्मतेज गूढरूपानें वास करीत आहे, अशा या निरपराधी ब्राह्मणाजवळ माझ्या हातून एखाद्या हलकट माणसाप्रमाणें नीच वर्तन झालें ॥ १ ॥

अर्थात माझ्या हातून घडलेल्या या ब्राह्मणाच्या अवहेलनेमुळें खरोखर माझ्यावर मोठें अपरिहार्य संकट ओढवणार ! खरें म्हटलें तर माझ्या हातून पुनः अशी गोष्ट होऊं नये म्हणून तसें संकट माझ्या पापाच्या निरसनासाठीं माझ्यावर अवश्य येवो ! ॥ २ ॥

क्रोधाविष्ट झालेल्या ब्राह्मणकुलरूपी अग्नीनें, माझें अधमाचें राज्य, सैन्य आणि समृद्ध असें द्रव्यभांडार आजच दग्ध करून टाकावें, आणि ब्राह्मण, देव व गाई, यांचा अपराध करण्याची दुष्ट बुद्धि यापुढें मला केव्हांहि न व्हावी, अशीच माझी इच्छा आहे ॥ ३ ॥

याप्रमाणें परीक्षित् राजा मनांत विचार करीत असतां शमीकऋषीच्या पुत्रानें ' तक्षकापासून मृत्यु येईल ' असा आपल्याला शाप दिल्याचें वर्तमान त्यानें ऐकिलें तेव्हां आपल्यावर लवकरच येणारा तक्षकरूपी हा अग्नि, संसारावर आसक्त झालेल्या आपल्या अंतःकरणांत वैराग्याची ज्योत उत्पन्न करणाराच आहे, असें समजून त्यानें त्याचें अभिनंदनच केलें ॥ ४ ॥

मृत्युलोक, त्याचप्रमाणें स्वर्गलोक हे दोन्ही इतिकर्तव्यतेच्या दृष्टीनें त्याज्य होत, असा त्याचा विचारपूर्वक निश्चय पूर्वीच झाला होता. तेव्हां त्यांची इच्छा सोडून व श्रीकृष्णचरणाची सेवा हेंच उत्तम साध्य आहे असें समजून, तो परीक्षित्‌राजा गंगानदीच्या तटाकीं मृत्यु येईपर्यंत उपोषण करीत बसून राहिला ॥ ५ ॥

श्रीकृष्णाच्या चरणांपासून उत्पन्न झालेला गंगेचा प्रवाह, त्याच्या चरणांवरील अत्यंत रमणीय अशीं तुळशीपत्रें आणि धूळ मिसळल्यामुळें इतर नद्यांच्या प्रवाहाहून श्रेष्ठ झालेला आहे आणि म्हणूनच श्रीशंकरासह उभय लोकांना तो पवित्र करतो. अशा त्या पवित्र गंगाप्रवाहाचें सेवन कोणता मरणोन्मुख पुरुष करणार नाहीं ?

म्हणून गंगेच्या तीरावर प्रायोपवेशन करावयाचें, असा निश्चित विचार करून परीक्षित् राजानें मौनव्रत धारण केलें आणि सर्व विषयांचा त्याग करून एकनिष्ठ भक्तीनें तो श्रीकृष्णचरणांचें ध्यान करूं लागला ॥ ७ ॥

तेव्हां महाप्रभावशाली आणि सर्व जगाला पवित्र करण्याचें सामर्थ्य ज्यांस आहे, असे अनेक ऋषि आपआपल्या शिष्यांसह तेथें आले. कारण साधु पुरुष हे बहुधा तीर्थ-स्थलांचें सेवन करण्याच्या मिषानें स्वतः त्या तीर्थांनाच पवित्र करीत असतात ॥ ८ ॥

अत्रि, वसिष्ठ, च्यवन, शरद्वान्, अरिष्टनेमि, भृगु, अंगिरा, तसेंच पराशर, विश्वामित्र आणि परशुराम, उतथ्य, इंद्रप्रमद व इध्मवाह, मेधातिथि, देवल, आर्ष्टिषेण, भारद्वाज, गौतम, पिप्पलाद, मैत्रेय, और्व, कवष, अगस्त्य, व्यास, भगवान् नारद, आणखी दुसरे मोठमोठे देवर्षि, ब्रह्मर्षि, तसेंच अरुण आदिकरून राजर्षि, आणि अनेक ऋषिवंशांतील थोर पुरुष तेथें आले. ते सर्व आले असतां परीक्षित् राजानें त्यांचा सत्कार करून त्यांना साष्टांग नमस्कार केला ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥

मग ते सर्व ऋषि आपापल्या आसनांवर सुव्यवस्थित बसल्यावर राजानें त्यांना पुनः एकवार नमस्कार केला. त्याचें मन वैराग्यानें अगदीं शुद्ध झालेलें असल्यामुळें तो त्यांच्या पुढें हात जोडून उभा राहिला व जें कांहीं करावयाचें त्यानें योजिलें होतें तें तो त्यांना मोकळेपणानें सांगूं लागला ॥ १२ ॥

राजा म्हणाला, " ऋषिहो, आपल्यासारख्या थोरांच्या कृपेला आमचें वर्तन पात्र झाल्यामुळें आम्ही खरोखरच सर्व राजांमध्यें धन्य आहों. कारण खरें म्हटलें तर, निंद्य कर्म करणारें राजाचें कुळ, ब्राह्मणांच्या पाय धुण्याच्या पाण्याच्या पलीकडे टाकल्यासारखें आहे ॥ १३ ॥

माझें चित्त घरादारादि भोग्य वस्तूंवर नित्य आसक्त झालेलें असल्यामुळें मीं खरोखरच पापी आहें. मला वैराग्य उत्पन्न करणारा असा ब्राह्मणाचा शाप झाला. हा शाप-रूपानें परमेश्वरच भेटला म्हणावयाचा ! कारण आसक्त झालेल्या मला त्यामुळें संसाराचें भय त्वरित उत्पन्न झालें ॥ १४ ॥

मीं परमेश्वराच्या ठिकाणीं चित्त लाविलें असून त्यालाच शरण आलों आहें, असें ब्राह्मणांनीं व गंगादेवीनें निश्चयपूर्वक जाणावें. आतां मला ब्राह्मणाच्या शापानें प्रेरणा केलेला तक्षक कोणत्याहि वेशानें येऊन दंश करो; तुम्हीं मात्र परमेश्वराचें गुणगायन करा, ( मी तें ऐकतों ) ॥ १५ ॥

ज्या ज्या योनींत माझा जन्म होईल तेथें तेथें सर्वत्र पुनः परमेश्वरावरच माझें प्रेम जडावें, त्याच्या भक्तांची मला संगति घडावी, तसेंच थोर पुरुषांशीं माझी मैत्री राहावी आणि ब्राह्मणांचा मजकडून सत्कार घडावा " ॥ १६ ॥

असा निश्चय करून त्या ज्ञानी परीक्षितानें राज्याचा भार आपल्या पुत्रावर सोंपविला आणि गंगानदीच्या दक्षिण तीरावर पूर्वेस अग्रें करून दर्भ पसरिले व स्वतः उत्तराभिमुख होऊन त्यांवर तो बसला ॥ १७ ॥

तो राजश्रेष्ठ परीक्षित् याप्रमाणें प्रयोपवेशनाचा निश्चय करून बसला असतां स्वर्गांतून देवसमुदायांनीं त्याची स्तुति केली आणि आनंदानें पृथ्वीवर फुलांचा वर्षाव करून ते नगारे वाजवू लागले ॥ १८ ॥

तेथें जे मोठे ऋषि आले होते त्यांचा स्वभावच लोकांवर कृपा करण्याचा होता. त्यांनीं परीक्षिताचा निश्चय पाहून त्याची प्रशंसा केली आणि ' उत्तम निश्चय केलास ' असें म्हणून त्याला अनुमति दिली. नंतर श्रीकृष्णलीलावर्णनामुळें रमणीय असें भाषण करण्यास त्यांनीं सुरुवात केली ॥ १९ ॥

ते म्हणाले, ' हे राजर्षिश्रेष्ठा, श्रीकृष्णाचें व्रत एकनिष्ठेनें आचरणाऱ्या तुझ्या कुळांतील पुरुषांनीं असा निश्चय करावा यांत आश्चर्य कसलें ? कारण भगवान् श्रीकृष्णाच्या समीपतेचा लाभ व्हावा म्हणून त्यांनीं खरोखर राजमुकुट आणि सिंहासन यांचा एका क्षणांत त्याग केला ॥ २० ॥

' भगवद्भक्तांत श्रेष्ठ असा हा परीक्षित्राजा शरिराचा त्याग करून, जेथें अज्ञान आणि शोक नाहींत अशा उत्तम लोकाला जाईपर्यंत आम्ही सर्वजण येथेंच राहूं. ( असा ऋषींनीं निश्चय केला. ) ॥ २१ ॥

परीक्षिताला श्रीकृष्णाचें चरित्र ऐकण्याची उत्कट इच्छा होती. यास्तव ऋषिसमूहाचें तें निष्पक्षपाती, सत्य, अमृतासारखें मधुर आणि गंभीर असें भाषण ऐकून, त्यानें त्यांचें अभिनंदन केलें आणि प्रसंगाला योग्य असें भाषण तो करूं लागला ॥ २२ ॥

लोकांवर अनुग्रह करण्यासाठीं ज्याप्रमाणें त्रिभुवनाच्या[1] पाठीवर मूर्तिमंत वेद अवतरले, त्याप्रमाणें मजवर अनुग्रह करण्यासाठी तुम्हीं सर्वजण चारी दिशांहून येथें जमलां आहांत. लोकांवर अनुग्रह करणें हेंच तुमचें शील आहे, त्याशिवाय ह्या किंवा परलोकीं तुमच्या ठायीं दुसरा हेतुच नाहीं ॥ २३ ॥

यासाठीं, हे ऋषि हो, तुमच्यावर माझा विश्वास आहे. आपण योग्य असेल तेंच केवळ सांगणारे असल्यामुळें, माझें आतां इतिकर्तव्य काय, याविषयीं मीं आपल्याला प्रश्न विचारीत आहें सर्व परिस्थितीमध्यें आणि विशेषतः मृत्यु जवळ आला असतां मनुष्यानें आपलें कर्तव्य शुद्ध रीतीनें कसें करावें, तें विचारपूर्वक मला सांगा ॥ २४ ॥

ऋषि आणि राजा परीक्षित् यांचें असें संभाषण चाललें आहे, इतक्यांत ज्याच्या मागें मौज पाहाण्यासाठीं बायकामुलांचा घोळका जमला आहे, ज्याला कसलीच अपेक्षा नाहीं, आत्मप्राप्तीच्या आनंदामुळें ज्याचा वेष सर्वसंगपरित्याग केलेल्या वैराग्याप्रमाणें आहे, जो कोणत्या वर्णाचा किंवा आश्रमाचा आहे हेंहि समजण्यास साधन नाहीं, असा व्यासांचा पुत्र भगवान् शुकाचार्य सहजगत्या पृथ्वीच्या पाठीवर फिरतां फिरतां तेथें येऊन पोंचला ॥ २५ ॥

त्याचें वय सोळा वर्षांचें होतें. त्याचे हात, पाय, मांड्या, दंड, स्कंध, गाल इत्यादि अवयव फारच कोमल होते. त्याचे डोळे सुंदर आणि विस्तृत, नाक उंच, कान

१ त्रिभुवनाचें पृष्ठ म्हणजे सत्यलोक असें टीकाकार म्हणतात.

प्रमाणबद्ध, आणि भुवया सुरेख असल्यामुळें त्याचें मुख रमणीय दिसत होतें. शंखाप्रमाणें त्याच्या कंठावर तीन सुंदर रेषा होत्या. मांसल स्कंधांमुळें त्याची मान झांकून गेली होती. त्याचें वक्षःस्थल विशाळ आणि ताठ होतें. नाभि पाण्यांतील भोंवऱ्याप्रमाणें वर्तुलाकृति असून त्रिवळीमुळें उदराला विशेष शोभा येत होती. त्याच्या अंगावर वस्त्र नव्हतें आणि त्याचे केश अस्ताव्यस्त पसरले होते. तो देवश्रेष्ठ विष्णूप्रमाणें आजानुबाहु व श्यामवर्णाचा असून त्याचें अक्षय्य यौवन आणि तेजस्वी अंगकांति यामुळें त्याजकडे पाहतांच त्याच्या सुंदर हास्यामुळें स्त्रियांचें मन हरण होत असे. त्याचें सामर्थ्य अव्यक्त असलें तरी त्याच्या लक्षणांवरून[1] त्याची योग्यता त्या ऋषींना ठाऊक होती; म्हणून तो येतांक्षणींच ते आप-आपल्या आसनांवरून उठून त्याच्या सत्कारार्थ उभे राहिले व त्याला सामोरे गेले ॥ २६ ॥ ॥ २७ ॥ ॥ २८ ॥

परीक्षित्‌राजानें त्या आलेल्या अतिथीच्या पायांवर मस्तक ठेवून त्याला वंदन केलें. ह्या प्रकारें पाहतांच त्याच्याभोंवतीं जमलेलीं अज्ञान बायकामुलें तेव्हांच तेथून निघून गेलीं आणि सर्वांनीं सत्कार केलेले शुकाचार्य महासनावर बसले ॥ २९ ॥

तेव्हां अनेक ब्रह्मर्षि, राजर्षि तसेंच देवर्षि यांच्या समुदायांत थोरांतील थोर असा तो शुकाचार्य बसला असतां, चंद्राच्या आजूबाजूला गुरु-शुक्रादि ग्रह, रोहिण्यादि नक्षत्रें आणि तारापुंज असतां जसा तो चंद्र शोभतो, तसा तो शोभूं लागला ॥ ३० ॥

शांत स्वभावाचा आणि अकुंठित बुद्धीचा असा तो शुकमुनि आसनावर बसला असतां परीक्षित् राजा त्याच्याजवळ गेला, आणि मस्तक लववून त्यानें त्याला नमस्कार केला व हात जोडून तो उभा राहिला. नंतर स्वस्थ चित्तानें आणि मधुर शब्दांनीं त्याला तो नम्रपणें विचारूं लागला, ॥ ३१ ॥

हे ऋषिवर्या, तुम्ही कृपा करून अतिथिरूपानें आमच्याकडे आलां, त्यामुळें आम्ही क्षत्रबंधु असतांहि पवित्र होऊन सज्जनांना मान्य झालों आहों ॥ ३२ ॥

आपल्यासारख्या सत्पुरुषांच्या केवळ स्मरणानेंच गृहस्थाश्रमी पुरुषांचीं घरें तत्काळ शुद्ध होतात; मग ते प्रत्यक्ष घरीं आले, त्यांचा स्पर्श झाला, त्यांच्या पादप्रक्षालनाचें पाणी घरांत पडलें आणि ते घरांत येऊन बसले, तर तीं पवित्र होतील हें काय सांगावयास पाहिजे ? ॥ ३३ ॥

हे योगिश्रेष्ठा, भगवान् विष्णूच्या सान्निध्यामुळें असुर नाश पावतात, त्याप्रमाणें तुमच्या सान्निध्यानें मोठमोठीं पातकें देखील नष्ट होतात ॥ ३४ ॥

'मला तर खरोखर वाटतें कीं, पांडवांवर प्रेम करणाऱ्या भगवान् श्रीकृष्णानें ज्या अर्थी त्यांच्या कुळांचें पाठीराखेपणा आपल्या शिरावर घेतलेलें आहे, त्या अर्थी त्या आतेभावांना संतोष व्हावा म्हणूनच तो माझ्यावर प्रसन्न झाला आहे !' ॥ ३५ ॥

---

१ या तीन श्लोकांत बत्तीस लक्षणी पुरुषाच्या खुणा सांगितल्या आहेत.

असें नसतें तर, ज्यांची गति कोणाला कळत नाहीं, असे तुमच्यासारखे सिद्ध पुरुष, वाटेल तें द्यावयास तयार होऊन, माग माग म्हणत आमच्यासारख्या अगदीं मरणोन्मुख माणसांना दर्शन कसें देणार ? ॥ ३६ ॥

तुम्हीं योगीजनांचेहि श्रेष्ठ गुरु आहांत ! यास्तव मी आपणाला विचारितों कीं, पुरुष मरणोन्मुख झाला असतां त्याचें निश्चित कर्तव्य कोणतें आणि त्याची सिद्धि कोणत्या मार्गानें होईल ? ॥ ३७ ॥

' हे प्रभो शुकाचार्या, जें कांहीं मनुष्यांना श्रवण करण्यास, जप करण्यास, आचरण्यास, स्मरण करण्यास अथवा भजन करण्यास योग्य असेल किंवा याच्या उलट जें कांहीं ऐकण्यास, स्मरण्यास किंवा भजण्यास अयोग्य असेल तें सर्व तुम्हीं मला सांगा ॥ ३८ ॥

' अहो शुकाचार्यमहाराज, आपण गृहस्थांच्या घरीं गेला तरी, कोठेंहि गोदोहना-इतका वेळ सुद्धां उभे राहिलेले मीं पाहिलें नाहीं ॥ ३९ ॥

सूत म्हणतात—शौनक हो, परीक्षित्‌राजानें तो धर्मवेत्ता व्यासपुत्र शुकाचार्य यांस याप्रमाणें गोड शब्दांनीं प्रश्न केला असतां, श्रीशुकाचार्यानें त्यास उत्तर देण्यास आरंभ केला ॥ ४० ॥

## एकोणिसावा अध्याय समाप्त

## पहिला स्कंध समाप्त

---